# माझा
# आफ्रिकेचा प्रवास.

अथवा

## आफ्रिकेंतील काफिरांचा देश.



( प्रवास--वृत्त )


लेखक

शिकंदर लाल आतार शिक्षक, सेंट्रल स्कूल.

भिलवडी जि. सातारा.




# माझा आफ्रिकेचा प्रवास.

अथवा

## आफ्रिकेतील काफरांचा देश.

( प्रवास-वृत्त )

लेखक,

शिकंदर लाल आतार शिक्षक. [illegible]

भिलवडी जि. सातारा.

आवृत्ति पहिली

सन [illegible]

किंमत ८ आणे.

# आत्म-निवेदन



**केल्यानें देशाटन, पंडितमैत्री सभेंत संचार।**
**शास्त्र-ग्रंथ-विलोकन मनुजा चातुर्य येतसें फार॥**

वरील कवितेमध्यें मनुष्याचें ज्ञान वाढविण्याचीं जीं साधनें सांगितलीं आहेत, त्या पैकींच प्रवास हें एक साधन होय. प्रवास करणें हें बहुधा सर्वांनाच आवडतें. परंतु तें सर्वांनाच साधतें असें नाहीं. प्रकृतीचें अस्वास्थ, द्रव्याभाव वगैरे कारणामुळें ज्यांना प्रवास करणें अशक्य असतें त्यांनीं निदान प्रवासवर्णनें तरी वाचावीं, म्हणजे त्यांना निरनिराळ्या देशांचे रीतरिवाज, धर्म, धंदे वगैरे गोष्टींचें ज्ञान होऊन त्यांचे अंगीं चातुर्य येतें, त्यांच्या कोत्या समजुती नाहींशा होऊन दुरभिमान जातो व चांगल्या गोष्टींबद्दल यथार्थ अभिमान उत्पन्न होतो.

प्रवासवर्णनापासून असे अनेक फायदे आहेत. परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, मराठींत अशीं प्रवासवर्णनें फारशीं नाहींत व जीं आहेत तीं बहुतेक एकाच प्रकारचीं ह्मणजे पाश्चात्य देशांच्या वर्णनाचीं आहेत.

यामुळें त्यांत वैचित्र्य फारसें येत नाहीं. या करितां पृथ्वींतील निरनिराळ्या देशासंबंधीं प्रवासवर्णनें तयार होणें इष्ट आहे. उत्तर व दक्षिण ध्रुवाकडील बर्फाचा प्रदेश, आफ्रिकेंतील अरण्यमय प्रदेश वगैरे प्रदेशांचा शोध कसा लागला, तेथील लोकस्थिति कशी आहे वगैरे गोष्टींचें ज्ञान होण्याकरितां त्यांचीं वर्णनें मराठींत तयार झालीं पाहिजेत. परंतु तसे प्रयत्न झाल्याचें दिसत नाहीं. त्यांतहि बाल वाचकांकरितां एकहि प्रवासवृत्त तयार झालेलें नाहीं म्हटल्यास चालेल. ही उणीव भरून काढण्याकरितां हा अल्प प्रयत्न करण्यांत आला आहे.

आफ्रिका हा अगदीं अरण्यमय व रानटी देश आहे. तेथें नाना प्रकारचे हिंस्र प्राणी व क्रूर लोक आहेत. त्यांशीं झगडून

व संकटें सोसून युरोपियन लोकांनीं त्या देशाचा महा प्रयासानें कसा शोध लाविला आहे. तो प्रवास ते लोक कशा प्रकारें करीत, त्यांच्यावर कसे प्रसंग गुदरत वगैरे गोष्टींची माहिती असणें इष्ट आहे. या करितां आफ्रिकेंत प्रवास करणाऱ्या एका युरोपियन प्रवशांचें हें प्रवासवृत्त मराठी वाचकांपुढें मी मांडीत आहें. मला हें प्रवासवृत्त बंगाली 'प्रवासी' मासिकांत वाचण्यास मिळालें. त्यांत तें बाल वाचकांसाठीं प्रसिद्ध होत असें. तें मी वाचलें, तेव्हां मला फार आवडले म्हणून मी तें माझ्या प्रिय बाल मित्रांकरितां मराठींत अनुवादलें आहें. त्याचें लेखक बाबु प्यारीमोहनसेन गुप्त हें बाल वाङ्मय लिहिण्यांत मोठे पटाइत आहेत. त्यांच्याच भाषेचे मी अनुकरण केलें आहे. तें कितपत सुरस वठलें आहे तें ठरविण्याचे काम वाचकांकडे आहे.

सदर पुस्तक लिहिण्याचें कामीं प्यारीबाबूंच्या लेखांचा उपयोग झालेला असल्यामुळें त्यांचा व मासिकाचे संपादक श्रीयुत रामानंद चतरजी यांचा मी फार फार आभारी आहे.

सरस्वतीमंदिर, भिलवडा.
जि. सातारा, विजयादशमी
शके १८४८

आपला,
कृपाभिलाषी,
शिकंदर लाल आतार.

# विषयानुक्रमणिका.



# चित्रांची अनुक्रमणिका.







# माझा आफ्रिकेचा प्रवास.

## अथवा

# आफ्रिकेंतील काफिर लोकांचा देश.

## प्रकरण १ लें.



### वाळवंटांतील प्रवास.

मुलांनों, आपल्या या महाराष्ट्रांत प्राचीन काळीं मनुष्यवस्ती फारशी नव्हती. त्या वेळीं येथें एक मोठें अरण्य होतें. त्याला " **दण्डकारण्य** " म्हणत. हें तुम्हांस महाराष्ट्राचा इतिहास वाचतांना कळलेंच असेल. त्या कालीं येथें मनुष्य वस्ती फारशी नव्हती. तर जिकडे तिकडे नानाप्रकारचीं भयंकर श्वापदें व इतर प्राणी हिंडत होते. मनुष्यप्राणी कांहीं असलेच, तर अगदीं थोडे होते व तेहि त्या पशूंप्रमाणेंच हिंस्र व रानटी होते. त्यांना कोणी " राक्षस " म्हणत. रामायणांतील राक्षस व वानर यांचीं वर्णनें तुम्ही वाचलीं असतील, तेच येथले मूळ रहिवासी. त्यांचेच हल्लीचे वंशज म्हणजे भिल्ल, कोळी वगैरे लोक होत. पण हे लोक तेव्हां अगदीं थोडे होते. पुढें उत्तरेकडून आर्य लोक- आले आणि त्यांनीं तें " दण्डकारण्य " तोडून हळूहळू गांवें व शहरें वसविलीं. तेव्हां त्यांना कित्येक पशूंशीं झगडावें लागलें. तेव्हां आपल्या महाराष्ट्रांत हत्ती, सिंह, वाघ, गेंडे, रानडुकरें, हरणें, साप, कांसवें वगैरे प्राणी विपुल होते; जेव्हां येथें लोक वस्ती बरीच झाली, तेव्हां ते रानटी प्राणी सह्याद्रि, सातपुडा, विंध्याद्रि वगैरे पर्वतांच्या व डोंगरांच्या आश्रयास गेले. पुढें

कालांतरानें हळूहळू त्यांच्या जाती नष्ट होत गेल्या. त्यामुळें आतां आपणांला पदोपदीं हिंस्र प्राणी आढळत नाहींत आणि तसे ते आढळत नाहींत म्हणून तर आपण वाचलों आहोंत !

असे प्राणी इकडे आढळत नाहींत खरें पण आपली ही पृथ्वी विपुल आहे; तिच्या एका भागांत " **आफ्रिका** " म्हणून जो देश आहे, तेथील लोकांना " **काफ्री अथवा काफीर** म्हण-तात. त्यांचा रंग काळामिट्ट, केंस मेंढराच्या लोंकरीप्रमाणें रांठ व आंकडलेलें, ओंठ बाहेर उलटलेले आणि मोठे व लठ्ठ शरीर-रचना ओबडधोबड आणि बलिष्ठ अशी आहे. ते एके काळीं नर-मांस भक्षण करीत. हल्लीं ते अगदीं रानटी आहेत. त्यांच्या देशांत मागें–पुढें सर्वत्र बहुतेक जंगल आहे. त्या देशांतील त्या जंगलांतून जसे जिराफ, झेब्रा, हरिण वगैरे प्राणी आहेत तसे वाघ, सिंह, चित्ते, गोरिल्ला नामक वानरें हींहि आहेत. शिवाय तेथें मोठमोठे हत्ती, चमत्कारिक वानरें, धिप्पाड गेंडे व भयंकर सुसरी आहेत. तेथें हिपापोटेमस असतात पाण्यांत, हायेना अस-तात जमिनीवर, शिम्पाजी असतात झाडांच्या डहाळ्यावर व पतंग असतात जंगलांत. शिवाय आणखी तेथें उंट पक्षी, पायथन आणि पांढऱ्या मुंग्या आहेत त्या वेगळ्याच. पायथन म्हणजे एक प्रका-रचे प्रचंड साप असतात. ते हरिण व शेळ्या मेंढ्या गटागट गिळतात. आणि येथील मुंग्या आपल्या टोळ्या करून बाहेर पड-तात. एकेका टोळीची रुंदी सुमारें अर्धा मैल व लांबी कित्येक मैलपर्यंत असते. त्या जिकडे जातात त्या बाजूचीं झाडेंझुडें, जना-वरें व माणस हीं खावून फस्त करून टाकितात.

अशा या भयंकर देशांत एकदां लहानपणीं मी जाऊन पडलों होतों. तेथें माझे काका काफिर लोकांना नानाप्रकारचे पदार्थ विकण्याचा व्यवसाय करीत.

मी काकाजवळ जाऊन हजर झालों, तेव्हां ते ग्रेहाम टौन शहरीं होते. तेथून दूरवर अंतरावर असणाऱ्या नाग्मी सरोवरा-

जवळ एके ठिकाणीं काकांचे एक स्नेही व्यापार करीत होते.

एके दिवशीं आम्हीं नागमी सरोवराकडे जाण्यास निघालों. आमच्याजवळ व्यापाराचे नानाप्रकारचे जिन्नस व कित्येक गाई आणि घोडे होते. गांव सोडून आम्हीं थोडेसें दूर जातों तों इतक्यांत आमचेवर एक भयंकर संकट ओढवलें. त्या रस्त्याच्या कोणत्या तरी एका बाजूनें अकस्मात् " हे है रे रै " असे शब्द करीत तेथील रानटी लुटारू लोकांची एक टोळी आमच्या अंगावर तुटून पडली. आमचे सामानसुमान, गाई व घोडे बहुतेक त्यांनीं लुटून नेलें. काका आणि मी दोन घोडे, एक गाय व कांहीं थोडेसें सामान सांभाळून त्या अरिष्टांतून कसें तरी बचावलों. आणि आमचे बरोबर असणारा आमचा नोकरहि बचावला. तो नोकर त्या देशचाच होता. मोठा विश्वासू माणूस. त्याचें नांव होतें जान.



काफिर दरोडेखोर.

पुढें सरळ मार्गानें गेल्यास पुनः लुटारू लोकांचा हल्ला येईल अशा भीतीनें आम्हीं एका आड मार्गानें निघालों. येथील राजमार्ग काय, आणि आडमार्ग काय, दोन्ही सारखेच. एक जंगल तरी असावयाचें, नाहींतर वाळवंट. नाग्मी सरोवराच्या जवळ जाणें असल्यास कलहारीच्या वाळवंटांतून जावें लागतें. वाळवंटांतील एखादा अर्धवट माहितीचा रस्ता असतो. त्या मार्गानें गेल्यास त्रास थोडा कमी होतो परंतु आम्हीं लुटारू लोकांच्या भीतीनें गैरमाहितीचा रस्ता धरून चाललों. अगोदरच वाळवंटांतलि रस्ता, आणि तोहि गैरमाहितीचा. त्या मार्गानें खाण्यास कांहीं मिळेल कीं नाहीं व पाणी मिळेल किंवा नाहीं, याचा कांहीं अंदाज लागला नाहीं. तथापि प्राणाच्या भीतीनें मनाचा हिय्या करून आम्हीं त्या मार्गानेंच चाललों. तेव्हां आमची सर्व आशा व भरंवसा हीं जानवर होतीं. तो त्या देशाचा माणूस होता व तें वाळवंटहि त्याच्या कांहींसें माहितीचें होतें. म्हणून साहस करून आमचा मार्ग पाहात आम्ही चाललों.

जानचा चेहरा लांबट,वाटोळा व रंग धुरकट काळा होता. मुख अगदीं विद्रूप होतें. जणुं काय भुताचा अवतारच. आमचें बोलणें त्याला कांहीं थोडेंसें समजे. आणि त्याचें उत्तर तो आपल्या अद्भुत धेडगुजरी भाषेंत देई.

दिवसांवर दिवस आम्हीं मार्ग चालत होतों. परंतु तो मार्ग केव्हां संपणार ते जान सांगेना. जवळ पाण्याचा जो सांठा होता तो तर संपून गेला, वाळवंटांत रस्त्यामध्यें विसावा घेण्याकरितां कांहीं खळगे पाडलेले असत. त्यांत थोडेसें खणलें म्हणजे पाणी लागे. एकदां अतिशय तहान लागल्यामुळें एके जागीं बरेंच खणलें तेव्हां थोडेसें पाणी लागलें; पण तें मोठें चमत्कारिक होतें.

परंतु त्यानंतर तीस मैलपर्यंत रस्ता चालून गेलों, परंतु पाण्याचा कोठें मागमूसहि लागला नाहीं. आमची गाय व घोडा हीं तर तहानेनें अगदीं व्याकूळ होऊन गेलीं. मलाहि अतिशय

अंधारांत चक् चक् करीत होत. मला वाटलें, हें जनावर आतां थोडक्याच वेळांत आमचेवर झेंप टाकणार. म्हणून मी घाबरून ओरडलों—" वाघ, काका, वाघ ! "

काका खडबडून जागे झाले आणि चटकन् उठून बसले.

वाघ गुरगुर शब्द करीत हळू हळू पुढें येऊं लागला. काकांनीं हळूच बंदूक घेऊन त्याच्यावर नेम धरिला आणि गोळी सोडली. गोळी लागल्यामुळें वाघ मरून पडला असें नाहीं. मोठी गर्जना करून तो मोठ्या जोरानें उसळला आणि त्यानें आमच्यावर उडी घेतली. त्या उडीबरोबरच मीहि त्याला गोळी घातली. त्या बरोबर आमच्या सुदैवानें ती गोळी बरोबर त्याच्या छातीवर लागली. आणि तात्काळ तो धाडादिशीं मातींत पडला. तेव्हां आम्ही त्या वाघाचें कातडें काढून घेतलें आणि पहाट होतें न होतें तों आम्ही पुढचा रस्ता सुधारला.

कांहींसें पुढें जाऊन पाहतों तों आमचें समोरच एक मोठें सरोवर असलेलें दिसलें. त्याच्यावर मोठमोठ्या लाटा खेळत होत्या. तो देखावा पाहून मला तर मोठीच उमेद आली. या खेपेस आतां ' पाणी ' ' पाणी ' करून प्राण सोडण्याची पाळी येणार नाहीं, असेंहि वाटलें आणि मोठा आनंद झाला; त्याकडे निरखून पाहतों तों सरोवराच्या आजूबाजूनें कित्येक झाडें आहेत आणि त्याच्या कांठाकांठानें हरणें इकडे तिकडे उड्या मारीत आहेत असें दिसून आलें. तसेंच त्याच्या कांठीं कित्येक घोडेहि हिंडत होते. तें पाहून मी जानला पाणी दाखविलें, परंतु त्यामुळें त्याला आनंद झाल्याचें कांहीं चिन्ह दिसलें नाहीं. मी तर मोठ्या वेगानें व उत्कंठेनें पाणी पिण्याकारितां तिकडे चाललों. पण हाय ! थोडेसें पुढें जाऊन पाहतों तर तेथें पाणी—बिणी कांहीं नाहीं, ती एक चुनखडी व वाळू याची एक टेकडी होती. सूर्य किरणांच्या विलक्षण उष्णतेमुळें ती पाण्याप्रमाणें झळझळ करून पाण्याचा भास उत्पन्न करीत होती. यालाच म्हण-

तात मृगजळ. वाळूवर सूर्याचे उन्ह पडल्यामुळें उष्णतेनें हवा तापून दूरचे पदार्थ निराळ्याच स्थितींत आहेत असा भास उत्पन्न होतो. उष्णतेनें पृथ्वीला लागून असलेले हवेचे थर तापून वर जातात, वरचे थर खालीं येतात, यामुळें हवेंत जी खळबळ होते त्यामुळें पाण्याचा भास होतो. व त्यांत आजूबाजूच्या झाडांच्या व प्राण्यांच्या छाया दिसतात. मी ज्याना घोडे म्हणत होतों ते होते झेब्रा. झेब्रा म्हणजे घोड्याचेच धाकटे बंधु. त्यांच्या अंगावर रेघारेघांचे पट्टे असतात.

संध्याकाळ होऊन गेली. आजहि सर्व दिवसभर पाणी मिळालें नाहीं. आमचे प्राण कासावीस झाले होते. आमचे दोन्हीहि घोडे उभ्यानेंच खालीं पडून धुग् धुग् करीत होते.

जान एकाएकी समोरील एका लहानश्या झाडाजवळ जाऊन उभा राहिला; आणि त्यानें मोठ्या तांतडीनें गाईच्या पाठीवरून कुदळ काढून घेऊन, झाडाच्या बुढ्यांजवळ खणण्यांस आरंभ केला. सुमारें एक फूटभर खणतांच मातीच्या बाहेर एकाद्या मोठ्या टरबुजाप्रमाणें एक फळ दिसूं लागलें. तें बाहेर काढून व कापून त्यांतून त्यानें गपागप कांहीं खाऊनहि टाकलें. आम्हींहि तें थोडेंसें तोंडांत घालून पाहिलें. तें चांगलें थंडगार व पाण्यानें रसरसलेलें होतें. त्यांतील थोडेंसें गाईला व घोड्यांनाहि चारलें. त्यांनीं तें एका मिनिटांतच खाऊन टाकिलें. रस्त्यानें जातांना आणखी एका प्रकारचें टरबूज मला जाननें दिलें. तेंहि खाण्यास बरें लागत होतें. तसलें कांहीं टरबूज बरोबर घेऊन आम्हीं चाललों. त्याच्या दुसऱ्या दिवशींहि आम्हांला तीं फळें खाऊनच पाण्याची तहान भागवावी लागली.

काकांच्या जवळून जवळून चाललों होतों. तों समोर दूर अंतरावर सहज दृष्टि गेली तों तिकडून आमच्याकडे कसलेसे प्राणी येत आहेत असें दिसले. काका म्हणाले ते शहामृग. त्यांची मान उंटाप्रमाणें बारीक व लांबट होती व पाठीवर रंगीबेरंगी

पिसें होतीं. आम्हीं त्यांतून एक दोन पक्षी मारून बरोबर घेण्याचें ठरविलें.

आम्ही गपचीप उभे राहिलों. ते पक्षी कधीं तीराप्रमाणें सुटत, तर कधीं थबकून उभे राहून गोल होऊन फिरूं लागत. त्यांपैकीं दोन तीन पक्षी दिसण्यांत कुरूप होते व ते हळूंहळूं येत होते. त्यांना पाहून जान म्हणाला " ते पक्षी नव्हत. ते शहामृगांची शिकार करणारे पारधी आहेत." मलाहि त्यांच्याकडे थोडें निरखून पाहिल्यावर तें खरें वाटलें. तीं माणसेंच होती. प्रत्येकानें आपल्या पायाला पिसें बांधलीं होतीं.आणि पाठीवर एका मलेल्या शहामृगाचें पुच्छ लाऊन आपल्या डोक्यावर शहामृगाचें डोकें लाऊन दिलें होतें. आणि त्यांच्या हातांत तीरधनुष्य होतें. त्यांना दुरून पाहूनच शहामृगांना वाटे कीं, हे आपले जातिबंधू आहेत. अशाप्रकारें शिकारी लोक हळूंहळूं त्या पक्ष्यांच्या जवळ येऊन त्यांना तीर मारून त्यांनीं एकेक पक्षी मारीत मारीत सर्व पक्षी मारिले. त्यानंतर त्यांचीं पिसें काढून घेऊन ते तीं आमचेकडे विकण्यास घेऊन आले. आम्ही कांहीं पिसें विकतहि घेतलीं. जान त्यांना म्हणाला, तुम्ही आम्हांला एखादी नदी किंवा सरोवर दाखवून द्याल तर आम्ही तुम्हांला कांहीं पैसे बक्षीस देऊं. तेहि राजी झाले. त्यांच्यापैकीं एकजण तत्काळ पळत एका बाजूला गेला आणि एका खळग्यामध्यें थोडेसें उकरून त्यांत एक मोकळी नळी लाऊन तोंडांतून हवा ओढूं लागला. तेव्हां एकाएकीं त्या नळीच्या चावींतून पाणी वाहूं लागलें. आमच्या जवळ ज्या बाटल्या व भांडीं होतीं, तीं भरून घेतलीं आणि गाईला व घोड्यालाहि खूब पाणी पाजलें.

आम्ही पाणी पिऊन तयार झालो आणि मागें वळून पाहतों तों बाकीच्या लोकांनीं झाडपाला जमवून आम्हांला राहण्याकरितां एक लहानशी झोंपडीहि तयार केल्याचें दिसलें. त्या झोंपडींतच आम्ही त्या दिवसाची रात्र घालविली. परंतु ते लोक चांगले

आहेत कीं नाहींत, व आमच्या सामानसुमानाची चोरी करून आम्हांला मारून तर टाकणार नाहींतना, अशी आम्हांला भीति वाटूं लागली. जान म्हणाला, " ते फार चांगले लोक आहेत. त्यांच्यापासून आपणांला भीति मुळींच नाहीं. "

आम्ही उतरलों होतों त्याच्या चोंही बाजूला अफाट वाळवंट पसरलें होतें. आणि त्याच्या दरम्यान आमची जी झोंपडी होती त्या लहानग्या झोंपडींत रात्र काढून दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही लवकर उठून त्यांच्या बरोबर पुढें निघालों. त्या लोकांनीं आम्हांला एका मोठ्या सरोवराच्या कांठीं पोहोंचविलें आणि ते निघून गेले.

काकांना आशा होती कीं, त्या देशांतील लोकांना आपला माल विकून विपुल पैसा मिळवूं. परंतु बहुतेक माल चोरीस गेला होता. म्हणून आतां हत्ती मारून त्यांचे दांत, व वाघ आणि हरणें मारून त्यांचीं कातडीं, नेता आलीं तर कांहीं द्रव्य मिळेल अशी आम्हांला आशा वाटूं लागली.

आशा प्रकारें त्रासानें दिवस काढीत आम्ही कांहीं दिवस चाललों. वाटेंत तीन चार जागीं खणल्यावर पाणी लागलें. येवढ्या अवधींत शिकार कांहीं मिळाली नाहीं. मार्गानें जात असतां एके दिवशीं उन्हानें दूर पाणी असल्याचें दिसलें. यावेळीं तें मृगजळ नव्हतें. आम्ही आतां एका सुंदर नदीच्या कांठीं येऊन पोहोंचलों होतों. तिच्या आजूबाजूस मोठमोठीं झाडें होतीं. नदींत पाणी थोडेंच होतें, त्यामुळें आम्ही ती ओलांडून पलीकडे गेलों. परंतु पावलोंपावलीं भीति वाटत होती कीं, सुसर, हिपापोटेमस, कांसवें, गेंडे वगैरे जलचर प्राण्यांच्या भक्ष्यस्थानीं तर पडणार नाहींना ? परंतु तसें कांहीं न होतां सुखरूपपणें पैलतीरास जाऊन पोहोंचलों आणि प्रचंड वृक्षाच्या छायेखालीं जाऊन हजर झालों. त्या झाडाचें नांव होतें " बाउबाब. " त्याच्या खालीं गवतहि पुष्कळ होतें. गाय व

घोडे यांनीं तें गवत खाऊन पार नाहींसें केलें. झाडाच्या खालीं जाऊन बसतों न बसतों तों एक प्रकारच्या माशा येऊन आम्हांला चाऊं लागल्या.

यावर आतां येथें बसणें ठीक नाहीं, असें जाणून त्या झाडाची सावली सोडून, त्या तापलेल्या वाळवंटाच्या वाळू-मधून, कडक उन्हाचा मारा सहन करीत, पुनः आपल्या मार्गाला लागलों.

---

# प्रकरण २ रें.



## सिंहाच्या दाढेंत !



तो माशांचा अड्डा सोडून चालत चालत आम्ही एका सरोवराच्या कांठीं येऊन पोहोंचलों. ह्या सरोवराला एक लहानशी नदी मिळाली होती. सरोवराच्या कांठींच आमचे तंबू ठोकण्यांत आले. ह्यावेळीं पोटोबांची तर भर्ती केली पाहिजे, म्हणून काका आणि मी हातांत बंदूक घेऊन शिकारीसाठीं बाहेर पडलों.

थोडेसें दूर जातों न जातों तों समोरच एक हरिणांचा कळप आलेला दिसला. काका जवळच एका झुडपाआड अंग छपवून बसले. मीहि एका झुडपाआड जाऊन लपून बसलों. हरणें आमच्या जवळच चरत होतीं. त्यापैकीं एका मोठ्याशा हरणावर नेम धरून मी चटकन गोळी झाडली. पण तो खालीं न पडतां धडपडत धडपडत चालूं लागला. त्याबरोबर ताबडतोब झुडपाच्या आडून पुढें येऊन मी त्याच्या मागोमाग जाऊं लागलों. पण अरे, बापरे ! समोरच एक प्रचंड सिंह भेटला ! व तो माझ्याकडे टक-मक टकमक पाहूं लागला ! घाबरून जाऊन जर मी पळूं लागलों तर तो खात्रीनें आपले अंगावर चाल करील म्हणून तेथेंच उभा राहून साहस करून मीहि त्याच्याकडे टक लाऊन पाहूं लागलों. आणि दोन्ही हातानें बंदूकींत गोळी भरूं लागलों. परंतु मनांतले मनांत म्हणूं लागलों कीं, जर मी एक गोळी झाडली आणि त्या गोळीनें सिंह मेला नाहीं तर नुसताच जखमी झाला आणि मग रागानें आपल्या अंगावर तुटून पडला तर मग काय करणार ?

पुनः विचार आला, तसें झाल्यास जवळच्या एखाद्या झाडावर चढून बसतां येइल; पण वेळ मिळाला तर ! पण आश्चर्य वाटूं लागलें कीं, सिंह हरणांना न मारतां येथें स्तब्ध उभा का ! पुनः वाटलें कीं यानें नुकताच एखादा प्राणी मारून खाल्ला असेल, त्यामुळें त्याला शिकारीची जरूरच नसेल. कांहींहि असो. मी बंदूक तर भरून टाकली. सिंह तेव्हां मोठमोठ्यानें डुरकण्या फोडीत होता व आपल्या गर्जनेनें सर्वरान दणाणून सोडून आपलें शेपूट जमीनीवर आपटीत होता. प्रत्येक क्षणाला वाटूं लागले कीं हा आतां आपले अंगावर हल्ला करणार. यामुळें त्याच्यावर गोळी सोडण्याशिवाय प्राण वांचविण्याला दुसरा उपाय नाहीं असें पाहून गोळी झाडावी असें मनांत ठरविलें. इतक्यांत पुनः असें वाटलें कीं, काकांना एकदां मोठ्यानें हाक मारावी म्हणजे ते मला या संकटांतून सोडविण्यास धाऊन येऊं शकतील आणि माझ्या ओरडण्यानें सिंहहि थोडासा भिऊन जाईल. असा विचार करून मोठ्या जोरानें एक आरोळी मारिली. तेव्हां उलट लांबून काकांचाहि शब्द ऐकूं आला.

इकडे सिंहाची गर्जना आणि शेंपूट आपटणें हीं ज्यास्तच वाढूं लागलीं. परंतु तो तेव्हांपर्यंत एक पाऊलहि पुढें सरला नव्हता. मी मात्र त्याच्याकडे एकसारखी टक लावून पहात होतों. शेवटीं त्याची गर्जना जेव्हां आणखी भयंकर झाली, तेव्हां प्राण जावो अथवा राहो असें म्हणून मीहि त्याच्याकडे बंदूक रोखली. तोहि मांजराप्रमाणें हळूं हळूं एकेक पाऊल पुढें टाकित माझ्याकडे पुढें पुढें येऊं लागला. मी बंदूकीचा घोडा दाबला. परंतु काय दुर्दैव ! गोळी उडालीच नाहीं. पाहातों तों सिंहानें माझ्या अंगावर उडी मारलीहि. परंतु इतक्यांत एक बंदूकीचा आवाजहि कानांवर पडला. त्याबरोबरच एक भयंकर गर्जनाहि ऐकूं आली. यानंतर एका प्रचंड ओझाच्या भारानें मी खालीं पडलों. त्यानंतर पुढें काय झालें तें मला कळलें नाहीं.

जेव्हां मी सावध झालों. तेव्हां पाहतों तों काका माझ्याजवळ बसले आहेत आणि माझ्या अंगाला कांहीं जखम झाल्यामुळें तिच्या वेदना होत आहेत असें दिसलें. काका म्हणाले—" मी येऊन गोळी मारिली नसती तर आज तूं वांचला नसतास. तुला सिंहानें एक पंजा मारिला आहे आणि तुझ्या खांद्यावर जखम केली आहे. "

काका मला उचलून घेऊन मोठ्या कष्टानें तंबूत आले. माझी जखम बरी होण्यास आतां बरेंच दिवस लागणार, ही गोष्ट कळून चुकली. जाननें तर एक लहानशी झोंपडीहि तयार केली. तो झाला माझा दवाखाना. त्यांत आतां किती दिवस रहावें लागणार याचा अंदाज लागेना.

दिवसांवर दिवस येथें लोटूं लागले. काका हरिणांची शिकार करून आणीत. त्याचाच थोडासा रसा आणि मांस खाऊन माझा दिवस जाई. जखम अगदीं सावकाशीनें हळूंहळूं बरी होऊं लागली. तिच्या वेदना प्रथम प्रथम फार भयंकर होत होत्या. काका माझ्याजवळ बसून अगदीं मनापासून माझी सेवाचाकरी करीत.

एके दिवशीं काका शिकारीला गेले होते. मी त्या झोपडींतच पडून नानाप्रकारचे विचार करीत होतों. आम्ही जेथें राहिलों होतों त्याच्याजवळ आसपास बहुतेक झाडीच होती. झोंपडीपासून थोड्याशा अंतरावर नदीकांठीं अशा प्रकारच्या एका झाडीजवळ बसून जान लांकूड कापीत होता. तों एकाएकी त्याची किंकाळी ऐकून डोकावून पाहूं लागलों तों तो नदीच्या कांठाकांठानें पळत आहे आणि त्याच्या मागोमाग हिपापोटेमस अथवा पाणहत्ती त्याला मारण्याकरितां त्याच्यामागें लागला आहे. आतां एक दोन मिनिटामध्येंच तो जानला बहुतेक चिरडून मारणार, असें पाहून मी उठण्याचा प्रयत्न केला. परंतु मला उठतां येईना. बंदूकहि हाताजवळ नव्हती. जान बिचारा एका झाडाकडे अगदीं शिकस्तीनें

पळत होता. झाडावर तो ताबडतोब चढूं लागणार, तों इतक्यांत त्याचा पाय निसटून गेला. आणि तो धाडकन् एकप्रकारें आयताच त्या जनावरापुढें जाऊन पडला. आतां मात्र त्याच्या रक्षणाचा कांहीं उपाय राहिला नाहीं. परंतु त्याचें नशीब काय थोर, काका अगदीं त्या वेळेला कोठूनसे पळत आले आणि त्यांनीं मागील बाजूनें त्या पाणहत्तीला कानाजवळ एक गोळी घातली. त्याबरोबर तें प्रचंड जनावर तेथल्यातेथेंच गों गों करीत धाडकन् पडलें. जान तेवढ्यांत लोळत लोळत थोडासा पुढें गेला म्हणून बचावला, नाहींतर तो त्या धुडाखालीं सांपडून चेंगरूनच मरतां ! त्यानंतर तो आंग झाडून उठून उभा राहिला आणि रडव्या विद्यामुखानें त्या जनावराकडे एकसारखें पाहूं लागला. तेव्हांही तें जनावर मेलें आहे कीं नाहीं याचा त्याला संशयच वाटूं लागला होता.

जानचा तो चेहरा पाहून तशा दुःखाच्या प्रसंगींहि मला फारच हसूं कोसळलें. काका त्याला म्हणाले—“ आतां भिण्याचें मुळींच कारण नाहीं. तें जनावर आतां मेलें. त्याला आतां ओढून नेऊन कोठें तरी टाकलें पाहिजे. नाहींतर रात्रीं त्याची भयंकर घाण सुटेल. आणि तरस, लांडगे वगैरे जनावरें तें खाण्यास येऊन मोठी आपत्ति कोसळेल.

काका आणि जान या दोघांनीं मिळून त्या जनावराच्या पायाला दोरी बांधिली आणि ती दोरी घोडा व गाय यांना बांधून तें जनावर फरपटत फरपटत ओढून नेलें. माझ्याजवळ एक बंदूक ठेविली होती. ते गेल्यानंतर मला मोठी भीति वाटूं लागली. आसपासच्या झाडींतून नानाप्रकारचे आवाज येत होते. माझ्या मनांत येई, हे सिंह ओरडत आहेत. ही लांडग्यांची लढाई चालली आहे. मधून मधून जिराफ व हरिणांचे कळप जात असलेले दिसले. असो. शेंवटीं काका जेव्हां फिरून परत आले. तेव्हां पुनः माझ्या जिवांत जीव आला.

त्या रात्रीं तरस आणि कोल्हीं यांचें चित्कार आणि भांडणेंही रातभर माजल्यामुळें आम्हांला झोंप मुळींच आली नाहीं. सर्व रात्रभर आगटी पेटवून आणि मधून मधून बंदूक उडवून त्यांना हांकून देत होतों.

आणखी कित्येक दिवस तेथें गेले. एके दिवशीं मला वाटलें कीं आतां आपली प्रकृति थोडी बरी आहे. तेव्हां काकांना मी ती गोष्ट कळविली. तेव्हां असें ठरलें कीं उद्यां सकाळीं आपण पुनः पुढें जाण्यास निघावयाचें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं हरिणाच्या मांसावर न्याहरी करून आम्ही पुनः मार्ग चालूं लागलों. मला तेव्हां चालण्याची शक्ति नव्हती. म्हणून काकांनीं मला एका घोड्यावर बसविलें. पहिले दोन दिवस बरे गेले. मला फारसा त्रास झाला नाहीं. पण तिसऱ्या दिवशीं सकाळपासून मला फारच त्रास होऊं लागला. तेव्हां समोर मोठें प्रचंड मैदान आलें होतें. तें ओलांडावयाचें होतें. तें मैदानहि वाळवंटाप्रमाणेंच भयंकर त्रासदायक होतें. गाय कशीतरी रखडत रखडत चालत होती. पण घोडे तसेहि चालेनात. विशेषतः मी ज्यावर बसलों होतों, तो तर अगदींच रेंगाळत होता. शेवटीं तो धाडदिशीं पडलाहि. त्याबरोबर मीहि पडलों. परंतु काकांनीं मला ताबडतोब उचलून घेतलें. घोडे मात्र त्यापुढें वांचले नाहींत; ते वाळूंत तोंड खुपसून धडपड धडपड करून मरून गेले.

दुसऱ्या एका घोड्याच्या पाठीवरून सामानसुमान उतरून व तें गाईच्या पाठीवर लादून त्या घोड्याच्या पाठीवर काकांनीं मला बसविलें; परंतु काय दुर्दैव ! तें घोडेंहि थोड्या वेळानें कलंडून पडून मरून गेलें. या वेळीं मात्र मला बरेंच लागलें. अशा प्रकारें संकटावर संकटें आल्यामुळें आम्ही फारच त्रासून गेलों.

काकांनीं मग असा बेत ठरविला कीं, त्यांनीं जवळच एक गुहा पाहिली होती, त्यांत सर्व सामानसुमान दडवून ठेवून जाव-

याचें. तिच्या तोंडाला दगड रचून ती बंद करून टाकावयाची आणि पुढें एखादें वाहन किंवा कोणी माणसें मिळाल्यास तें सामान घेऊन जावयाचें; त्याप्रमाणें त्यांनीं तें सामानसुमान त्या गुहेंत ठेऊन दिलें. त्यानंतर गाईच्या पाठीवर आपण बसून त्यांनीं मला आपल्यापुढें घेतलें. माझ्याकरितां काकांना किती श्रम सोसावे लागले तें सांगतां येणें अशक्य.

आमच्याबरोबर आम्ही कांहीं खाण्याचे पदार्थच तेवढे घेतले होते. तसें आम्ही न करतों तर तें जनावर आम्हांला वाहून नेऊं कसें शकतें ? जान मार्ग पहात पहात चालला होता. मी काकांच्या पुढें निजलों होतों. क्रमाक्रमानें संध्याकाळ झाली. सुदैवानें ती रात्र चांदण्याची होती. यामुळें रस्ता शोधून काढण्यास आम्हांला फारसे कष्ट पडले नाहींत; परंतु माझी प्रकृति अशक्त झालेली असल्यामुळें तहानेनें छाती फाटून जात होती. जवळ पाणी तर बिलकूल नव्हतें. काकांनीं आधार दिला आणि जानहि म्हणाला कीं, आतां लौकरच पाणी मिळेल; परंतु मैलावर मैल जमीन चाललों तरी पाणी येईना. माझें शरीर आणि मन एक प्रकारें अगदीं व्याकूळ झालीं होतीं. एके वेळीं असेंहि ऐकिलें कीं, पाणी जवळ आलें. जान व काका या दोघांच्याहि तोंडून तसें ऐकिलें पण त्याचें पुढें काय झालें तें कळलें नाहीं.

जेव्हां डोळे उघडून पाहूं लागलों कीं, काका माझ्या डोळ्यांना व तोंडाला पाणी लावीत आहेत, तेव्हां आम्ही एका तळ्याच्या कांठीं आलों होतों. जान त्याच दिवशीं रात्रीं झोंपडी तयार करण्यांत गर्क झाला होता. गाय थोड्या अंतरावर चरत होती. थोड्या वेळानें त्या झोंपडींत निजतांच मी इतका गाढ झोंपीं गेलों कीं, अंथरुणावरून उठून पहातों तों तेव्हां चांगलें फटफटींत उजाडलें होतें.

नंतर थोडीशी वेळ झाल्यावर काका बंदूक घेऊन शिकारीसाठीं बाहेर पडले. मी पडल्या पडल्या ती जागा पाहूं लागलों.

तेव्हां मला असें दिसलें कीं, पूर्वीच्या मुक्कामाच्या जागेपेक्षां ही जागा फार चांगली होती. आमच्या झोंपडीच्या समोरच दोन लहानसे डोंगर होते. एकाएकीं एका डोंगरावरून एक प्रकारच्या चमत्कारिक हरणांचे कळप डोळ्यां समोरून बागडत गेलेले दिसले. त्यानंतर आणखी कांहीं कळप गेले. त्यावर आणखीहि कांहीं हरणें जातांना दिसलीं. इतकीं सुंदर हरणें यापूर्वी मी केव्हांहि पाहिलीं नव्हतीं. जान म्हणाला—दक्षिण आफ्रिकेंत हीं हरणेंच सर्वांत ज्यास्त सुंदर आहेत.

थोड्या वेळानंतर काका शिकार घेऊन परत आले. ह्या जागीं जंगल होतें, लांकूडफाटा मिळण्याची चांगली सोय होती, आणि शिकारीलाहि कांहीं उणीव नव्हती, म्हणून असें ठरलें कीं, मला बरें वाटूं लागून माझी प्रकृति दुरुस्त होईपर्यंत येथेंच राहावयाचें.

---

# प्रकरण ३ रें.



## हत्तींची शिकार आणि सिंहांचें युद्ध !

काहीं दिवसांनीं मी तंबूपासून थोडेसें दूर जाऊन येण्यासारखा तयार झालों. जेव्हां मी फिरण्यास निघत असे तेव्हां बरोबर बंदूक घेत असे. रोजच्या रोज इतकीं हरणें आणि जनावरें यांचीं शिकार होऊं लागली कीं, आमच्या बरोबर एखादी गाडी असती तर ती अगदीं गच्च भरून आम्ही त्यांची कातडीं आणलीं असतीं. एका गाईच्या पाठीवर आम्ही आणखी कितीसें ओझें लादूं शकणार ! मी थोडासा हिंडूं फिरूं शकतों असें पाहून काकांनीं असें ठरविलें कीं, आतां आणखीं दोन एक दिवसांनीं आपण आपल्या इच्छित स्थानीं जाण्याकरितां येथून निघावयाचें. परंतु तिकडे जाण्यास निघण्याचे पूर्वी मी कसा काय सुधारलों आहे याची परीक्षा पाहण्याकरितां काकांनीं एके दिवशीं मलाहि शिकारीला नेण्याचें ठरविलें. या शिकारीची हकीकत मोठी अद्भुत आणि मनोरंजक आहे.

शिकारीसाठीं बाहेर पडून थोडेसें पुढें जातों तों एका वृक्षाजवळ सुपल्याप्रमाणें कसल्या तरी दोन वस्तु हालत आहेत असें मला दिसलें. काका म्हणाले, " ते हत्तीचे कान. या हत्तीला आज मारलेंच पाहिजे. म्हणजे त्याचे दोन दांत आयतेच घेऊन जाण्यास मिळतील. आणि त्याचा एकादा पाय नेऊन त्यावर आजचें भोजनहि करतां येईल."

त्या हत्तीनें आमचेकडे पाहिलेंहि नसावें असें दिसलें. आम्हीहि हळूं हळूं झाडांच्या आडून त्याच्याकडे पुढें सरूं लागलों. असें जातां जातां सर्व झाडें संपून, मध्यें मोकळें मैदान आलें. तेव्हां

आम्हांला हत्ती अगदीं स्पष्ट दिसूं लागला. त्याच्या आणि आमच्यामध्यें आतां केवळ कांहीं किरकोळ झाडें—झुडपें मात्र होतीं.

काका मला कानांतले कानांत म्हणाले, " जर का हत्ती पुढें आला तर भिऊन पळूं नकोस. कांहीं वेळ त्याच्या तोंडाकडे पाहून त्यानंतर त्याच्या खांद्यावर गोळी मार. येवढ्यावरहि तो आंगावर आलाच, तर चटकन् डावीकडे किंवा उजवीकडे उडी मारून बाजूला हो, आणि जवळ आसपास जें झाड मिळेल त्यावर चढून बैस. मी माझी व्यवस्था पाहतों. माझी काळजी तूं करूं नकोस. "

तिकडे हत्ती थोडें थोडें पुढें सरत होता. मी तर त्याला गोळी घातली. त्याबरोबर काकांनींहि गोळी झाडली. दोन गोळ्या लागल्या असूनहि हत्तीला जखम झाली आहे असें वाटेना. दोन एक पावलें पुढें येऊन डावीकडे फिरून जरा गडबड करून जंगल तुडवीत तुडवीत तो निघून गेला. आम्ही पुनः बंदूक भरून त्याच्या मागोमाग जावयाचें असें ठरविलें. इतक्यांत ज्या बाजूनें पहिला हत्ती आला होता त्या बाजूला सुमारें दहा बारा हत्ती दिसूं लागले. तें सोंडेनें आणि पायानें झाडपाला ओरबडीत ओरबडीत आणि भयंकर गर्जना करीत एखाद्या वावटळाप्रमाणें आमचेपाशीं आले.

काका मोठ्यानें ओरडून म्हणाले, " अरे, पळ, पळ, या झाडींत घूस. नाहींतर जगण्याची आशा नको. शक्य असेल तर पुढच्या हत्तीला गोळी घाल. मी त्याच्या पलिकडल्याला घालतों. असें केलें तर हा कळप भिवून पळून जाऊं शकेल. "

एकाच वेळीं काकांनीं व मी गोळ्या झाडल्या. काकांनीं ज्याला गोळी घातली तो धाडकन् खालीं पडला. आणि मी ज्याला गोळी घातली होती तो असा जोरानें धांवून आला कीं, हा आतां माझा चुराडा करणार, असें मला वाटलें. तेव्हां

झटदिशीं आम्ही दोघेंहि झाडीमध्यें लपून बसलों. हत्ती रागारागानें पुढें येऊन आम्ही कोठें दिसत नाहीं असें पाहून फुसफुस करीत चालता झाला. परंतु त्यामुळें तें संकट नाहींसें झालें होतें, असें मात्र नाहीं. कारण तो हत्ती पुनः परत फिरण्याचाहि संभव होता. म्हणून त्याची शेपटेंसुद्धां जेव्हां जंगलाच्या आडून कोठें दिसतनाशी झाली तेव्हां आम्ही बंदूकींत गोळी भरून झाडावर चढण्याकरितां निघालों. मागें फिरतांच आम्हांला तो मेलेला हत्ती दिसला. काकांच्या इच्छेप्रमाणें त्याचे दोन्ही दांत कापून नेण्यांत आले. ते दोन दांत कांहीं सामान्य नव्हते. त्यानंतर त्याचा एक पाय कापून त्यांत एक काठी घालून तो वाहण्यास सोईस्कर अशी तजवीज केली. काका म्हणाले कीं, ते हत्ती आतां पुनः परत येणार नाहींत असें वाटतें, म्हणून आम्ही साहस करून तंबूकडे येण्यास निघालों. एक दांत मी स्वतः वाहून आणला. आणि एक जानला पाठवून आणविण्यांत आला. थोड्या वेळानें हत्तीचें मांस खाण्यांत आलें. तें चांगलें मऊ लागलें, कांहीं वाईट लागलें नाहीं. त्याच्याबरोबर खाण्यास गव्हाच्या पोळ्या मिळण्याची सोय त्या वाळवंटांत कोठून होणार? त्यामुळें जेथें तेथें प्राणरक्षणाकरितां आम्हांला मांसच खाऊन काळ कंठावा लागे. त्याला इलाज नाहीं. जेवण झाल्यानंतर त्या दिवशींचा दिवस बराच शिल्लक उरला होता. आणि मलाहि फारसा थकवा आलेला नव्हता म्हणून काका व मी पुनः शिकार करण्यास बाहेर पडलों. जान तंबूतच बसून ते दोन दांत साफ करूं लागला.

हत्तींच्या पायाच्या खुणावरून माग काढीत काढीत आम्ही पुढें जाऊं लागलों. तों मार्गांत मधून मधून रक्त सांडलेलें दिसूं लागलें. तें त्या जखमी झालेल्या हत्तीचेंच रक्त होय हें तेव्हांच आमचें ध्यानांत आलें. पुढें जातां जातां आम्ही एका लहानशा डोंगराच्यावर जाऊन पोहोंचलों. त्याच्यावर झाडांच्या गर्द

छायेंत एक झरा होता. त्यांतून एक बारीक पाण्याचा प्रवाह वाहात होता. पाण्याच्या बाजूबाजूनेंच आम्ही चालत गेलों. तेव्हां आम्ही एका लहानशा सरोवराच्या कांठीं जाऊन पोहों-चलों. तेथें जाऊन पाहतों तर त्याच्याच एका अंगाला पाण्या-जवळ एक हत्ती उभा राहून आपल्या सोंडेनें पाणी घेऊन अंगावर शिंपडीत होता. काका म्हणाले—"हाच तो प्रथमतः जखमी झालेला हत्ती; परंतु हा इतक्या दूर येऊन उभा राहिला आहे तेव्हां आतां त्याला मारण्याची कांहीं सोय दिसत नाहीं. तथापि पाहूं काय होतें तें."

तेव्हां झाडाच्या बाजूबाजूनें आम्ही त्याच्याकडे चाललों. परंतु तो मात्र इकडे तिकडे चोंहीकडे पाहात होता. जरासें पुढें जातों न जातों तो हत्तीचा कळप पुनः हजर! तेव्हां काकांनीं मला "पळ," "पळ लवकर;" म्हणून सूचना दिली. तेव्हां काका व मी आपापल्या जवळच्या झाडावर चढलों. आणि झाडावरून त्या कळपावर गोळ्या सोडूं लागलों. त्याचा परिणाम काय झाला तें कळलें नाहीं. तो जखमी हत्ती त्यांच्यांत येऊन मिसळला नाहीं. आम्ही समजलों कीं,इतक्या वेळपर्यंत तो बहुधा कोठें तरी मरून पडला असावा. झाडावरून आम्ही खालीं उतरतों न उत-रतों तों तीन जिराफ आमच्या दृष्टीस पडले. त्यांचा बांधा आणि रंग मोठा सुंदर होता. ते आपल्या लांब लांब माना उंच करून झाडांचा पाला खात होते. आम्ही खालीं उतरलों तर ते भिऊन पळतील म्हणून आम्ही तेथेंच थोडे थांबलों. एक जिराफ आपल्या कळपांतून वेगळा फुटून आमचे बाजूला येऊन उभा राहिला. तेव्हां काकांना यापुढें आपला लोभ आवरणें अशक्य झाल्यामुळें त्यांनीं त्यावर गोळी झाडली. गोळी लागतांच जिराफ विव्हळत विव्हळत खालीं पडला. अशा सुंदर प्राण्याला मारतांना पाहून मला वाईट वाटलें. दुसरे दोन जिराफ आवाज ऐकून गोंधळून गेल्यामुळें थोडा वेळ तेथेंच थबकून राहिले. आणि पुनः पाला

खाऊं लागले. इतक्यांत एक जिराफ कान उभे करून मेलेल्या जिराफाकडे पाहूं लागला तों त्याच्या बरोबरच आम्हांला त्याच्या उलट दिशेकडील झाडींतून एक सिंह येऊन त्या मेलेल्या जिराफावर उड्डाण घेत असलेला दिसला. सिंह मेलेलें जनांवर खात नाहीं, हें आम्ही जाणत होतों. परंतु बहुधा तें जिराफहि मेलेलें नसावें. त्याचा प्राण थोडासा धुग धुग करीत होता. थोडा वेळ जातों न जातों तों पुनः दुसऱ्या एका सिंहाची गर्जना ऐकूं आली. आणि त्या आवाजाबरोबरच दुसरा एक सिंह त्या झाडींतून येऊन पहिल्या सिंहाशीं युद्ध करूं लागला. त्या दोघांच्या गर्जनेनें तें सगळें रान जणूं काय थरथरा कांपूं लागलें. जिराफाला न खातां ते दोघेजण त्याच्या भोंवतीं गरगरा फिरूं लागले. त्यांच्यापैकीं कोणालाही त्या जिराफाला खाण्याची छाती होत नव्हती असें वाटलें. अशा प्रकारें खाण्यास जाऊन त्यांचे कित्येक जातभाई यापूर्वी संकटांत पडले आहेत, हें जाणूनच ते पुढें येण्यास धजत नव्हते. दुसऱ्या सिंहाची गर्जना ऐकून बाकीचे जिराफ पळून गेले होते म्हणून ते वांचले. नाहींतर ते त्यांच्या भक्षस्थानीं पडते.

काका म्हणाले—" या दोन सिंहांपैकीं एकाला मारलें पाहिजे म्हणजे दुसरा गोळीच्या भीतीनें आपोआप पळून जाईल. असें केलें नाहींतर जिराफाचें मांस मिळणार नाहीं. मी खालीं उतरून एकाला गोळी मारतों. ती गोळी सहन करूनही तो अंगावर येऊं लागला तर त्याला गोळी घालण्याकरितां तूं तयार ऐस, मी चटकन झाडावर चढेन. "

काकांचें भाषण ऐकून मला मोठी भीति वाटली. कारण खालीं उतरणें ह्मणजे एकप्रकारें सिंहाच्या दाढेंतच सांपडणें होय. मी त्यांना कांहीं सांगणार तों त्यापूर्वीच ते झाडाखालीं उतरलेही आणि बंदूक उभी करून त्या सिंहद्वयाकडे जाऊं लागले. ते सुमारें पंधरा हातावर असतील तों त्या दोन्ही सिंहाची त्यांच्यावर नजर गेली. काका बंदूक उभारून त्यांपैकीं एकाकडे रोंखून पाहूं

लागले. ते दोन्ही सिंह त्यांचे तें साहस पाहून क्षणभर चकित होऊन गेलेले दिसले. काकांनीं गोळी तर झाडली. एक सिंह किंकाळी फोडून त्या जिराफाच्या अंगावर पडला. दुसरा मात्र तसाच थबकून राहिला. तो बहुतकरून विचार करीत राहिला असावा कीं, आतां काय करावें, शत्रूवर हल्ला करावा कीं, पळून जावें. इतक्यांत काकांनीं बंदुकींत गोळी भरली आणि मला म्हणाले—" फ्रेड, आतां तूं याला मार पाहूं. "

मी गोळी सोडली. धूर नाहींसा झाल्यावर पाहातों तों सिंह तसाच उभा आहे. त्याच्याकडे पहातों न पहातों तों त्यानें काकांच्या अंगावर उडी घेतलीही; त्याबरोबर काकांनींहि फेर गोळी झाडली. ती त्याच्या छातींत लागून तो तात्काळ मरून पडला. मी तर आनंदानें ताबडतोब खालीं उतरून दोन सिंह व जिराफ यांची शिकार पहाण्यास धांवतच गेलों. सुरी बाहेर काढून काकांनीं थोडेसें जिराफाचें मांस कापून घेतलें. सिंहाचीं कातडीं काढून घ्यावयाचीं, परंतु तीं न्यावयाचीं कशीं याचीं पंचाईत पडल्यामुळें तीं घेतलीं नाहींत.

तेव्हां दिवस मावळून जाऊन चांगला दाट काळोख पडला होता. अशा वेळीं आह्मी त्या वाळवंटांतील हिंस्र पशूंनीं भरलेल्या अरण्यांत उभे होतों. परंतु काकांना त्याचें कांहींच वाटत नव्हतें. चोंहींकडून सिंहांच्या गर्जना कानांवर पडूं लागल्या. मनांत येऊं लागलें—'हा आतां आलाच' सिंहाशिवाय त्या अरण्यांत चित्ते, लांडगे, व वाघ यांनाही कांहीं तोटा नव्हता. त्यांतहि ते एकदम येते तर मग विचारावयासच नको. आम्हांला लोण्याच्या गोळ्याप्रमाणें गपागप त्यांनीं खाऊन टाकलें असतें.

आम्ही तंबूकडे चाललों. हातांत भरलेली बंदूक होती आणि तोंडानें मोठमोठ्यानें ओरडत होतों. सिंह आरडाओरड ऐकून भितात आणि भुकेलेले नसतील तर शिकार करीत नाहींत, हा त्यांच्या आंगचा एक मोठा गूण आहे. सुदैवानें तेव्हां आकाशात

तारा चमकत होत्या त्यामुळें त्यांच्या मिण मिण करणाऱ्या प्रकाशानें आम्हाला आमचा मार्ग दिसत होता.

पुष्कळ लांब आलों पण तंबू कोठें दिसेना. तेव्हां मला वाटलें आपण तंबू सोडून भलतीकडेच आलों. ती गोष्ट काकांना सांगितली तेव्हां ते धीर देऊन म्हणाले. " आतां इतक्यांत तंबूतील उजेड दिसूं लागेल. "

परंतु मला यापुढें चालवेना इतका मी थकून गेलों होतों एकदां उजवीकडे आणि एकदां डावीकडे असें मी पाहात होतों. कारण एखादे मृगराज कोठें तरी केस पिंजारून उभे नसतील कशावरून, असें वाटे. एकाएकी एकदम पांच सहा सिंहांच्या गर्जना ऐकूं आल्या. मी तर भीतीनें किंकाळीच फोडली.

काका म्हणाले—"फ्रेड, भिती कशाची? चल, आतां तंबूंतील दिवा दिसूं लागेल."

थोड्या वेळानंतर खरोखरच तंबूंतील प्रकाश दिसूं लागला. तंबूत येऊन जेवणखाण करून झोपीं गेलों. जान सिंह आल्यास त्याला हाकून देण्याकरितां जागत राहिला. रात्रीं मधून मधून पशुराजाच्या गर्जनांनीं आमची झोंप मोडत असे. त्याच्या दुसरे दिवशीं माझें आंग फार दुखूं लागलें. त्यामुळें आणखी एक दिवस उशीरानें पुढें जाण्यास निघावयाचें, असें ठरलें.

काका शिकारीकरितां हिंडत होते. मी एकटाच तेथें राहूं न शकल्यामुळें जवळच दोन एक हरणें मारण्याकरितां बाहेर पडलों. एक मोठें झाड पाहून त्यावर चढून ती जागा चांगल्या प्रकारें न्याहाळून पाहावी अशी मला इच्छा झाली. म्हणून झाडावर चढलों. तेथें माझ्या अंगास एक प्रकारचा चमत्कारिक गार वारा लागूं लागला. त्या वाऱ्यानें मला झोंप येऊं लागली;मधून मधून मी इकडे तिकडे पाहात होतों. तें झाड एका मैदानामध्यें होतें; त्याच्या समोर पूर्वेकडे एक सखल मैदान होतें. त्यामध्यें मधून मधून झाडें होतीं; त्यांच्या जवळच कित्येक झाडें दाट झाडींप्र-

माणें उगवलीं होतीं. आणि माझ्या दोन्ही अंगास थोडीशींच झाडें होतीं. कांहीं ठिकाणीं मोकळ्या भागीं एकेकटीच झाडें पाहरेकरी शिपायाप्रमाणें उभीं होतीं. दूरच्या एका झाडींतून एक हत्ती झाडपाला खात खात फिरत आला. त्या झाडीच्या पलीकडच्या अंगानें एका मनुष्याला हातांत बंदूक घेऊन त्या झाडीकडे येतांना पाहिलें. ते काका होते हें मी ताडलें. त्यांच्या समोरच हत्ती आहे—हें त्यांना कळविण्याकरितां मी ओरडलों. परंतु काकांना माझें बोलणें ऐकूं गेलें असें दिसलें नाहीं. कारण ते तसेंच पुढें चालले होते. हत्तीलाहि माझा आवाज ऐकूं आला नाहीं.

थोड्या वेळानें काका एक प्रकारें हत्तीच्या समोरच येऊन पोहोंचले. तेव्हां त्यांनाहि हत्ती दिसला. आणि हत्तीनेंहि त्यांना पाहिलें. व तो हळूं हळूं त्यांच्याकडे जाऊं लागला. झाडावरून उतरून हत्तीला मागाहून गोळी घालूं गेल्यास काकांचें संकट आणखीहि ज्यास्तच वाढेल—अशा भितीनें मी आणखी खालीं उतरलों नाहीं. काकांनीं बंदूक उभारून हत्तीवर गोळी झाडली. ती गोळी त्याच्या अंगास लागली असतांहि तो काकांच्याकडे आणखी जोराजोरानें जाऊं लागला. भयानें माझें काळीज कापूं लागलें. मीहि गोळी झाडली; परंतु हत्तीचें कांहींच झालें नाहीं. काका थोडें थोडें मागें सरत होते. हत्ती सुमारें बारा हाताच्या अंतरावर असेल, इतक्यांत काका एका सुकलेल्या झाडाच्या जवळ आले आणि त्यांनीं उडी मारून त्याची एक फांदी धरली. हत्तीहि त्यांना मारण्याच्या इराद्यानें येऊन सोंडेनें त्यांना धरूं लागला. सोंडहि काकांच्या पायास टेकली. तेव्हां अगदीं शिकस्तीचा प्रयत्न करून काका दुसऱ्या एका फांदीवर चढले आणि एका सुरक्षित जागीं जाऊन बसले. त्यांची टोपी खालीं पडली. हत्तीनें ती सोंडेनें वर उचलून धरली, आणि तो थोडा वेळ वर पाहूं लागला. हेतु हा कीं, काका ती टोपी घेण्यास पुढें आले

की त्यांना एकदम खालीं खेंचावें; परंतु त्याची या बाबतींत निराशा झाली. तेव्हां त्यानें झाडाला एक मोठा धक्का मारला. त्यानें झाड कंपित झालें; परंतु तें मोडलें नाहीं.

शेवटीं हत्ती काकांची ती टोपी घेऊन मोडूं लागला. तिचा चांगला बुक्का झाल्यावर तो त्या झाडाभोंवतीं चोहींकडे चिरचिरत चिरचिरत फिरूं लागला. तो हत्ती मोठा दुष्ट स्वभावाचा होता. हत्तींच्या कळपांत एखादांना एखादा हत्ती असा असतोच. हाहि मोठा रागीट होता. आणि अपराधाचा सूड उगविल्याशिवाय जाणारा नव्हता. त्याचा हा राग पाहून असें वाटलें कीं, हा आम्हांला धरल्याशिवाय सोडीत नाहीं. आमची त्यावेळीं काय अवस्था झाली असेल याची आपणाला कल्पना आली असेलच. त्या दिवशीं झाडावरच राहण्याची पाळी आली. कदाचित् दुसऱ्या दिवशींहि झाडावर राहावें लागेल असा संभव दिसूं लागला.



# प्रकरण ४ थें.

## काफिर लोकांची पाणीहत्तीची शिकार.



झाडावरें बसल्यानें दुःखाला सीमा नव्हती. मी ज्या झाडावर होतों तें झाड काकांच्या झाडापासून कांहींसें दूर होतें. जोरानें कांहीं बोलल्यास दोघांनाहि एकमेकांचें बोलणें ऐकूं येई. मी दिवसा कांहीं थोडेसें खाल्लें होतें. काकांनीं मात्र कांहींच खाल्लें नव्हतें. मलाही भूक लागली होती. एक ताम किंवा त्यापेक्षांहि जास्त वेळ गेला तरीहि हत्ती निघून जाण्याचें कोणतेही चिन्ह दिसेना. काकांची बंदूक झाडाच्या खालींच गवतांमध्यें पडली होती. आमचें नशीब चांगलें होतें म्हणूनच हत्तीनें तिच्यावर पाय देऊन ती खराब केली नाहीं. नाहींतर त्यानें आमचें मोठें नुकसान झालें असतें.

काका चिडून म्हणाले—फ्रेड, तूं याला गोळ्या घाल त्याशिवाय आतां सुटका नाहीं.

गोळ्या घालणें कांहीं अगदीं सोपें काम नव्हतें. एक तर मी झाडावर फार उंचीवर बसलों होतों. दुसरी गोष्ट एकादी दुसरी गोळी खाऊनही जर हत्ती न मरतां आणखी तें झाड टकरा देऊन मोडून टाकण्यास तयार झाला, तर संकट वाढेल पण कमी होणार नाहीं. अशी भीति होती. शिवाय मजजवळ तेव्हां अवघ्या पांचच गोळ्या शिल्लक होत्या. कांहींही असो. गोळ्या सोडण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं असें पाहून गोळ्या सोडूं लागलों. पहिली गोळी जाऊन हत्तीच्या गळ्याला लागली. तेव्हां त्याच्या गळ्यांतून रक्ताची धार लागली, परंतु हत्तीनें त्याला मुळींच जुमानलें

नाहीं. त्यावर मी पुनः गोळी घातली ती बरोबर त्याच्या खांद्या-च्या थोडीशी खालीं जाऊन लागली तेव्हां तो हत्ती भयंकर चित्कार करीत उठला आणि मारण्यास धाऊन झाडानें खोड सोंडेनें धरून तें उपटून काढण्याचा प्रयत्न करूं लागला. त्यामुळे तें झाड असें कांहीं कापूं लागलें कीं, काका हातानें व पायानें डाहाळ्या गच्च दाबून धरून त्याला चिकटून बसले. मी तिसऱ्यांदां गोळी घातली. ती अगदीं बरोबर त्याच्या कानावरच. पाहतों तों त्यांतून राहून राहून रक्ताच्या चिळकांड्या उडूं लागल्या व तो झोंक जाऊन खालीं पडला. त्याच्या सर्वांगावर रक्त झालें. व जमीनीवरून तर रक्ताचा पाटच वाहूं लागला. नंतर थोड्या वेळानें त्याची सोंड हळूं हळूं खालीं पडूं लागली व तो जमिनी-वर पाय पसरून पडला.

काका म्हणाले—फ्रेंड, आतां त्याचें आयुष्य संपत आलें आहे. आतां एकदां गळ्यावर गोळी घाल म्हणजे त्याचा एकदम शेवट होईल. ''

मी गोळी भरून घेऊन हत्तीच्या गळ्यावर मारली. त्याबरोबर तो ओंठ हालवून आंग आंखडून पडला. त्यानें यानंतर उठण्या-करितां पुष्कळ धडपड केली पण अगदीं व्यर्थ! यानंतर थोड्याशा वेळानें तो निपचिप पडला. जणूं काय मांसाचा डोंगरच!

मी व काका एकदांचे वांचलों. म्हणून दीर्घ श्वास सोडून तावडतोब खालीं उतरलों. बंदूक उचलून घेऊन काकाही निश्चिंत झाले. त्यानंतर त्या हत्तीचे दोन्ही दांत कापून एका झाडाच्या डहाळीवर पाल्यानें झांकून ठेविले व ते सवडप्रमाणें नेण्याचें ठर-विलें. कां कीं, ते दांत फार भारी होते. हत्तीचा एक पाय कापून व त्यांत एक झाडाची डहाळी अडकवून, तो खांद्यावर घेऊन आम्ही तंबूकडे चाललों. परंतु त्या दिवशीं संकटाला कांहीं सीमा नव्हती. पुनः एक नवीनच संकट उभे राहिलें. सुमारें अर्ध्या-मार्गावर आलों होतों. इतक्यांत झाड पाल्याच्यावर एका जिराफाचें

डोकें दिसलें.परंतु तें जनावर आम्हांला पाहून भिऊन न पळतां तें कांहीं कौतुकावह रीतीनें आमच्चेकडे पुढें पुढें येऊं लागलें. आम्हांला पाहून कदाचित् त्याला वाटलें असेल की हे नवीनच कसले प्राणी आले ? हीं कसलीं जनावरे आहेत ! अशा प्रकारें



सिंहाची जिराफाची शिकार.

आमच्याकडे मोठ्या कौतुकानें पहात तें येत होतें. परंतु त्याच्या मागोमाग तेव्हां एक मोठें भयंकर संकट होतें.एक सिंह मांजराप्रमाणें किरण साधून छपत छपत त्याच्या मागोमाग येत होता. सिंह शिकार करण्यांत इतका गढून गेला होता कीं, त्यानेंहि आम्हाला पाहिलें नाहीं. थोडा वेळ गुरगुर करून पुढें येऊन तो सिंह झटकन् जिराफाच्या पाठीवर उडी मारून बसला. या आकस्मात आलेल्या हल्लयानें जिराफही तडकन् उसळला. सिंह त्याच्या खांद्याचा चावा घेऊन व पाठीच्या चारी बाजूस पंजाच्या नख्या रोऊन त्यावर स्वार झाला. तेव्हां जिराफही एकदां डावीकडे, एकदां उजवीकडे,व एकदां पुढें अशा धांवा घेऊन उड्या मारून व लाथा झाडून सिंहाला ढकलून देण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करूं लागला. पण कांहीं जमेना. इतकें दुःख झालें असूनही त्यानें थोडी सुद्धां आरडा ओरड केली नाहीं परंतु त्याचा सर्व प्रयत्न व्यर्थ झाला. त्याच्या गळ्यांतून व पाठींतून झरझरा एकसारखा रक्तप्रवाह वाहात होता. शेवटीं तो आणखी दुःख सहन करूं शकला नाहीं. त्याच्या उड्या कमी झाल्या. व तो खालीं पडला. तेव्हां सिंह त्याचें मांस फाडून खाऊं लागला. जिराफ तेव्हां पाय झाडीत होता,व डोकें आपटीत होता.

काका म्हणाले,—"चल या सिंहाला मारूं या. आम्ही दोघे पुढें गेलों. माझेजवळ फक्त एकच गोळी शिल्लक होती. काकांनीं आणखी दोन दिल्या. मीच प्रथमतः गोळी झाडली, ती सिंहाच्या कंबरेंतून पार होऊन गळ्याला जाऊन लागली. गोळी लागतांच सिंह चित्कार करून आमच्याकडे येऊं लागला. काकांनीं गपचीप उभें राहून त्याला पुढें येऊं दिलें. नंतर तो जवळ येतांच त्यांनीं त्याच्या डोळ्यांवर गोळी मारिली. त्याबरोबर सिंहानें उडी मारिली. परंतु तो काना झाल्यामुळें त्याची उडी आमचेकडे न येतां भलतीकडेच गेली. तो आह्मा दोघांच्यामध्यें एका जागीं धाडकन् पडला; आणि तात्काळ मेला.

आमची सायंकाळची ही शिकार पाहून आम्ही दोघेहि आनंदित झालों. काका आणि मी जिराफाचें थोडें मांस कापण्यास गेलों. पण जिराफाचें कातडें कसलें कठीण ! जणूं काय गेंड्याचेंच कातडें ! ते सोलून काढावें तेव्हां त्याचें मांस कापलें जाणार. शेवटीं सुरीनें कातडें सोललें व मांस काढून घेतलें.

तंबूंत आल्यावर हत्तीच्या आणि जिराफाच्या मांसावर यथेच्छ ताव मारला. भारी चंगळ झाली. त्या रात्रीं रात्रभर तरस, लांडगे आणि कोल्हे यांची ओरड चालल्यामुळें कानठिळ्या बसल्या. लोक म्हणतात कीं, हे प्राणी मेलेल्या सिंहाला सुद्धां शिवण्याचें धाडस करीत नाहींत. परंतु सकाळीं पाहिलें, तेव्हां तेथें त्याचीं कांहीं हाडें मात्र पडलेलीं आढळलीं.

गाईच्या पाठीवर सामानसुमान लादून आम्ही पुन: उत्तर दिशेकडे निघालों. आमची गाय दुबळी व रोडकी झाली होती. यामुळें ती वाटेंत मध्यंतरी मरणार तर नाहीं ना ? अशी आम्हाला भीती वाटत होती. मार्ग चालत चालत आम्ही एका नदीच्या कांठीं येऊन पोहोचलों. वाळवंटांत आम्हांला जी नदी लागली होती त्याच्यापेक्षां ही फार रुंद होती. ही नदी उतरून आम्ही कसें जावें असा विचार पडला. नदी कांठीं पुष्कळ जंगली झाडें होती. ती पाहून मी म्हणालों, या झाडांच्या लांकडानीं झाडपाल्यांच्या भाऱ्यांचा ताफा तयार करून आपण नदी उतरून पलीकडे जाऊं.

तेथून थोड्याशा अंतरावर एक लहानसे बेट दिसत होतें. तें बहुतेक झाडांनीं आच्छादिलें होतें. त्याच्या कांठापासून आंत जाण्याकरितां केलेला रस्ताहि जंगली झाडांनीं भरलेला दिसत होता. तीं झाडेंझुडपें दाट अरण्याप्रमाणें दिसत होतीं. जानला व गाईला तेथेंच नदीकांठीं ठेऊन मी व काका त्या बेटाकडे चाललों; हेतु हा कीं, तेथें गेल्यावर ताफा तयार करण्यासारखीं झाडें तेथें आढळतील. त्या झाडाझुडांतून

जातां जातां आमचा जीव दमून गेला. त्या झाडींत वारा कसा तो लागलाहि नाहीं व दुसरें त्या दाट गवतपाल्यांत पाय टाकणें हि धोक्याचें असे. तो झाडपाला मोठ्या कष्टानें बाजूस सारीत सारीत रस्ता साफ करीत चाललों. त्या झाडपाल्यामध्येंच एक प्रकारचें गवत होतें. त्यांच्या तीक्ष्णधारेनें आमचे हात कापूं लागले. कांहीं झालें तरी त्याची पर्वा न करतां कुऱ्हाडीनें गवत व झाडें कापीत कापीत व आपला मार्ग तयार करीत बेटावर येऊन पोहोंचलों.

तेथें पोहोंचल्यावर आम्ही इकडे तिकडे पाहतों आहों इतक्यांत कित्येक माणसांच्या गळ्यांचा आवाज आम्हाला ऐकूं आला. थोड्याशा वेळानें पाहतों, तों लांब अंतरावरून कांहीं लहान लहान नावा वल्ही मारीत मारीत झराझर येत आहेत असें दिसलें. प्रत्येक नावेंत तीन माणसें होतीं. दोघें वल्ही मारीत होते. आणि एकजण नावेच्या मुखाकडे उभा होता. त्याच्या एका हातांत एक मोठा बळकट भाला व त्याच्या बरोबरच त्याला बांधलेला एक दोरहि होता. ह्या नदींत हिपापाटेमस अथवा पाणहत्ती होते त्यांचीच शिकार करीत हे लोक हिंडत होते. एकादा पाणहत्ती त्यांना दिसला असावा. त्याच्याच मागें हे लोक धांवत होते. एकाएकीं पहिल्या नावेंतील माणसानें आपल्या हातांतील भाला समोरच्या बाजूला मोठ्या जोराने फेंकिला; त्याबरोबर तो भाला एका प्रचंड पाणहत्तीच्या पाठींत जाऊन शिरला. तों, त्यानें घायाळ होऊन बहुतेक पाण्याच्यावर उडी मारून उसळला. नावेंतील दोघां माणसांनीं त्या भाल्याचा दोर मोठ्या जोरानें खेंचून धरिला. पाणहत्ती त्या भाल्यासुद्धां नांव ओढून नेऊन बों बों करीत सैरावैरा पळूं लागला. आम्ही कांठाकाठानें त्या नांवेबरोबर पळूं लागलों. परंतु नांव इतक्या वेगानें जात होती कीं, कांहीं मिनिटांमध्येंच ती आमच्या दृष्टीच्या टप्यांतून पार नाहीशी झाली. मागच्या अंगाला निरखून पाहतों तों आणखी एका नांवेला अशा प्रकारें भाला बांधलेला पाणहत्ती ओढीत ओढीत येत होता. ह्या

पाणहत्तीचें केवळ डोकेंच मात्र पाण्यावर दिसत होतें असें नाहीं, तर त्याच्या शरिराचा कांहीं भागहि वर दिसत होता. तें जनावर मोठें प्रचंड होतें जणुं काय गेंडच. त्याच्या डोक्यावर शिंगबिंग कांहीं नव्हतें तर तें मोकळेंच होतें.एकाएकीं तो थांबला आणि नांवेकडे माघारी वळून त्यानें तिला जोराचा धक्का दिला. तेव्हां त्या लोकांनीं त्याची दोरी थोडीशी सैल सोडली. त्याबरोबर तो रागानें उसळून नांवेवर तुटून पडला. पाहतों तों त्यानें त्यांतील एकाचा लचका धरिला. थोड्या वेळानें असें दिसलें कीं, त्या माणसाचा देह दुभंग होऊन वाहत वाहत जात होता. दुसऱ्या दोघांचा कांहीं पत्ताच लागला नाहीं. तेव्हां आम्हांला वाटलें कीं, त्या दोघांनाहि पाणहत्तीनें मारलें असावें. रागानें फुसफुसत फुसफुसत तो पाणहत्ती वरचेवर नांवेवर मारण्यास येऊं लागला.

थोड्याशा वेळानें पाहतों तो तीं दोन माणसें पोहत पोहत कडेला जात असलेलीं दिसलीं. आणि ते लोक भाल्याला बांधलेला दोर हातांत घेऊन कांठाकडे जात होते. कांठाला जाऊन पोहोंचतांच त्यांनीं ताबडतोब तो दोर एका झाडाला बांधून टाकिला. इतक्यांत आणखी दोन नांवा आल्या; त्यांतील लोकही झपाझप कांठाला उतरले आणि सर्वांनीं मिळून तो दोर ओढण्यास आरंभ केला. तो पाणहत्ती तो दोर तोडून टाकण्याचा नानाप्रकारें प्रयत्न करूं लागला; पण व्यर्थ ! तो जवळ आल्यास तीं माणसें मोठ्या साहसानें पाण्यांत उतरून त्याच्यावर भाले फेंकून त्याला भोंसकूं लागलीं. त्या माणसांचा चेहरा काळा भिन्न यमाप्रमाणें होता, आणि तें जनावरहि प्रचंड गड्याप्रमाणें होतें. अशा विचित्र प्राण्यांचें तें युद्ध म्हणजे एक अ भूत भयंकर प्रकारच होता ! अशी पुष्कळ लढाई झाल्यावरहि असें वाटूं लागलें कीं, तें जनावर दोर कातरून पळून जाणार. तेव्हां काका बंदूक घेऊन त्या लोकांच्याजवळ गेले. त्या प्राण्यानें त्यांच्याकडे तोंड

वळवितांच त्यांनीं त्याच्या तोंडांतच गोळी झाडली. तेव्हां तो पाण्यांत थोडीशी धडपड करून थंडगार होऊन पडला.

तेव्हां त्या लोकांचा आनंद काय विचारावा ! त्यांनीं किती तरी धन्योद्गार काढून काकांचें नानाप्रकारें आभार मानिले ! परंतु त्यांची भाषा आम्हांला मुळींच कळली नाहीं. काकांनींहि आपल्या स्वतःला त्याबद्दल आनंद वाटत असल्याची गोष्ट त्यांना कळविली. आणि त्यांना असेंहि जाणविलें कीं, त्यांनीं मेहरबानी करून आम्हांला नदीपलीकडे नेऊन, तिकडच्या गोरे लोकांच्या तंबूत नेऊन सोडल्यास आम्ही फारच आभारी होऊं.

ते लोक पाणहत्तीचें मांस कापून त्यानें आपल्या नांवा भरूं लागले. आणि आम्ही जानकडे परत आलों. काकांनीं एक कोयागो मारून आणिला. आणि मी एक हरिण मारिला. कोयागो म्हणजे गाढवाप्रमाणें एक प्रकारचा प्राणी आहे. त्या दोघांचें मांस शिजवून आम्ही जेवणाची तयारी करितों आहों, इतक्यांत आमचे ते नूतन स्नेही, आणि त्या नांवा येऊन हजर झाल्या, त्यांनाहि आमच्या खाण्याचे पदार्थ दिले. त्यांनीं आम्हांला कळविलें कीं, आम्हांला तिघांना ते एकदम पलीकडे नेऊं शकणार नाहींत. एकेकाला एकेक वेळीं नेऊं शकतील. परंतु ती गोष्ट आमच्या सोईची नसल्यामुळें आम्ही गवतांच्या भाऱ्यांचा एक ताफा तयार करण्याचेंच ठरविलें. संध्याकाळ झाल्यानंतर त्या लोकांनीं आमच्या मुक्कामापासून थोड्या अंतरावर झाडपाल्यांची एक झोंपडी तयार करून तेथें रात्र काढिली.

सकाळीं उठतांच मला कित्येक पायाच आवाज व खसपस खसपस असा ध्वनि ऐकूं येऊं लागला. तेव्हां थोडेंसें पुढें जाऊन पाहतों तों दक्षिण दिशेकडून मेंढरांच्या कळपाप्रमाणें एक प्रकारच्या सोनेरी रंगाचा मोठमोठ्या हरणांचा कळप, रांग धरून पूर्वेकडे कांहीं डोंगर होते, तिकडे वेगवेगळा होऊन जात होता. जेथपर्यंत नजर गेली तेथपर्यंत ती फेंकून मी पाहिलें तेव्हां केवळ

मैदानांतच नाहीं तर डोंगरावर सुद्धां हरणेंच हरणें भरलेलीं दिसलीं. आमचे स्नेही तात्काळ जागे होऊन उठले. त्यांना हरिणें दिसतांच तीं पाहून, ते काकांना व मला हरणांची शिकार करण्याविषयीं विनवूं लागले. आम्हीहि कबूल झालों. त्यांनीं आपल्या माणसांच्या दोन टोळ्या करून घेतल्या. एक टोळी आम्हांला घेऊन डोंगराकडे निघाली दुसरी टोळी हरिण ज्या दिशेनें येत होते त्या दिशेकडे निघाली. आम्ही थोडक्याच वेळांत त्या डोंगराच्या तळाशीं अगदीं त्या हरणांच्या समोरच येऊन पोहोंचलों. दुसरी टोळी त्या हरणांना मागाहून हुसकून पुढें आणूं लागलीं. त्यानंतर आम्हीं सर्वांनीं गोल होऊन त्या हरणांना चोहोंकडून घेरलें, नंतर त्यांची कत्तल करण्याचें भयंकर काम सुरूं झालें ! अनेक हरिण मारले गेले, तेव्हां त्या काळ्या लोकांचा आनंद गगनांत मावेना ! प्राण वांचविण्याकरितां हरिण उड्या मारीत होते. परंतु त्यांना पळण्याला वाटच मिळेना. जिवाच्या भीतीनें शेवटीं त्यांनीं एक मार्ग शोधून काढिला. ज्या बाजूला आम्हीं चांगल्या प्रकारें पुढें जाऊं शकलों नाहीं त्याच बाजूनें ते एका मागें एक पटापट निसटून जाऊं लागले.

जितके हरिण मारले गेले होते तितके सर्व आम्ही प्रत्येकीं एकेक याप्रमाणें घेऊन आलों. त्यांचें मांस खाऊन झाल्यानंतर आम्ही एक ताफा तयार करण्याची तयारी केली. नदी कांठचा पुष्कळसा झाडपाला कापून त्यांचे भारे बांधलें आणि ते भारे जोडून ताफा तयार केला. परंतु भीति अशी वाटत होती कीं, एकादी सुसर किंवा पाणहत्ती येऊन आमचेवर कृपा तर करणार नाहीं ना ? आम्हीं मागें जें सामान गुहेंत दडवून ठेऊन आलों होतों, तें परत आणावें तेव्हांच सर्व काम आटपेल असें जाणून आम्ही असें ठरविलें कीं,काकांनीं तेथेंच राहून सर्व सामानसुमान नदीपार पाठवावें,व मी आणि जाननें परत जाऊन दडवून ठेविलेलें सामान घेऊन यावें. त्याप्रमाणें मी व जान सामान आणण्यास निघालों.

---

# प्रकरण ५ वें.



## अरण्यांतील व पाण्यांतील प्रवास.



सकाळीं आम्ही निघालों. मी पुढें आणि जान मागें. त्याच्या मागोमाग गाय होती. आमच्याबरोबर सामानसुमान होतें, तें असें—आम्हांला निजण्याकरितां दोन कातडीं; कांहीं बंदुकीच्या गोळ्या व दारू आणि खाण्याकरितां कांहीं पदार्थ. गाईची ती अवस्था पाहून मला फार भीति वाटत होती. जानला विचारलें कीं, ती वाचेल कीं नाहीं ? जान थोडेंसें मनांतले मनांत पुटपुटून म्हणाला, आपण परत येईपर्यंत ती कशीबशी वांचेल.

दोन प्रहरीं आम्ही एका प्रचंड खैराच्या झाडाखालीं बसून विश्रांति घेतली. त्या झाडाच्या खालच्या डहाळ्याचीं पानें हत्तींनीं खावून टाकिलीं होतीं. झाडाच्या तळाला जेथें तेथें लहान लहान देवळाप्रमाणें मातीच्या टेकड्या दिसत होत्या. त्या टेकड्या आफ्रिकेंतील पांढऱ्या मुंग्यांचीं वारुळें होत. तेथें थांबून आम्ही कांहीं पारवे व इतर पक्षी यांची शिकार केली. जान ते पक्षी बांधून घेत होता, तोंपर्यंत मी कांहीं फळें मिळतात काय तें पाहात होतों. तेव्हां तेथें नारळाप्रमाणें गोलाकार अशी एक प्रकारचीं पुष्कळ फळें मिळालीं. एक अतिशय गमतीचें फळहि पाहण्यास मिळालें, तें बहुतेक लिंबाप्रमाणें दिसत होतें. त्याच्यावर टरफल होतें. तें फोडून पाहतों तों आंत एक प्रकारचे चमत्कारिक बदाम होते. ते पाडण्याकरितां मला उंच डहाळ्यावर चढावें लागलें. कां कीं, खालचीं फळें हत्तींनीं खाऊन टाकिली होती.

ह्या जागेत सिंह, चित्ते, गेंडे, हायेना इत्यादि प्राणी विपुल होते. याकरितां सर्वकाळीं मी बंदूक भरून अगदीं तयार ठेवीत असें. पहिल्या दिवशीं दूर अंतरावर मला कांहींसें दिसलें होतें. आम्हीं तंबू ठोकला होता तो एका झाडाखालीं. त्याच्या समोर साधू संन्याशी जशी थंडीची बाधा होऊं नये म्हणून धुमी पेटवून ठेवितात तशी आम्हीं वाघ, सिंह वगैरे पशुराजांची बाधा होऊं नये ह्मणून एक प्रचंड धुमी पेटवून ठेविली होती. आणि झाडाच्या बुंध्यापासून त्या धुमीपर्यंत अर्ध वर्तुळाकार असे दोन्हीं-कडे दोन कडे झाडांच्या मोटमोठ्या फांद्यांनीं तयार केलें होते. हेतु हा कीं, आम्ही निजलों असतांना एकाद्या हिंस्र पशूला जवळ येतां येऊं नये. ज्या प्रकारचे भयंकर चित्कार गेल्या कित्येक दिवसांत ऐकत होतो, त्या प्रकारच्या भयंकर चित्कारांचा या रात्रींही कांहीं अभाव नव्हता. मध्य रात्रीला एका सिंहाच्या गर्जनेनें झोंपमोड झाली. नीट न्याहाळून पाहतों तों एका मातीच्या टेकडीपासून कांहीं अंतरांवर एक सिंह उभा आहे! आमच्या कोटाच्या बाजूला येण्याचें साहस त्यानें केलें नाहीं. बहुत करून त्याला त्या झाडाच्याच फांद्या आहेत असें वाटलें असेल. जितकीं लाकडें जवळ शिल्लक होती ती सर्व जाळावीं तेव्हां त्या दिवशीं प्राण-रक्षण होण्याचा संभव होता.

सकाळीं जान लांकडे आणण्यास गेला आहे, मी स्वयंपाक करण्याकरितां पक्ष्यांचीं पिसें उपटीत आहें, इतक्यांत जानची किंकाळी व झाडपाला तोडण्याचा ध्वनि कानावर आला. तेव्हां मी बंदूक घेऊन ज्या बाजूकडून आवाज आला तिकडे तावड-तोब धांवलों. पुढें जाऊन पाहतों तों एक हत्ती दंगामस्ती करीत व जंगलाचा विध्वंस करीत चालला आहे आणि जान त्याच्या एका मागल्या पायाला धरून आंकडून उभा आहे; तें पाहून जानची अशी अवस्था कशी झाली तेंच मला कळेना. आतां काय उपाय करावा म्हणजे जानची त्यांतून सुटका होईल याचा

विचार पडला. जर त्याला पाय सोडून देऊन मागच्या अंगाला खालीं पडण्यास सांगावें, तर हत्तीनें न जाणों अंगावर पाय दिला तर प्राण जाण्याचाच प्रसंग! बरें पाय नाहीं सोडला तर तो जानला अरण्यांत किती लांब घेऊन जाईल त्याचाहि सुमार नव्हता. मोठ्यानें हाक मारून त्याला कांहीं सांगावें तर तसेंहि करण्यास मला साहस होईना. मला पाहून मग रागारागानें हत्ती जास्तच दंगामस्ती करील असा संभव वाटत होता. आतां दुसरा कांहीं उपाय नाहीं, असें पाहून मीं हत्तीच्या कानावर नेम धरून गोळी सोडली, पण हत्ती उभाच्या उभाच! आतां तो इकडे तिकडे डोकें हालवूं लागला तेव्हां मोठ्यानें ओरडून मी जानला मागें उडी मारण्यास सांगितलें. जाननेंहि तात्काळ मागें उडी घेतली व तो लपत छपत कसा तरी पळून आला. हत्तीहि डोकें हलवित हलवीत मातींत पडला. तेव्हां जान एकदम हंसत हंसत मजजवळ येऊन खूप मोठ्यानें हंसूं लागला. कुऱ्हाडीनें हत्तीचें दोन्ही दांत कांपून घेऊन ते आम्हीं गाईच्या पाठीवर लादलें.

त्यानंतर त्या गुहेंतील सामानसुमान आणण्यास निघालों. वाटेंत सिंह वगैरे कोणतेही हिंस्र प्राणी दृष्टीस पडले नाहींत खरें, पण हरिण, जिराफ व उंटपक्षी पुष्कळच पाहण्यास मिळाले. आम्ही गुहेजवळ येऊन पाहिलें तेव्हां त्याच्या तोंडाजवळ रचलेले दगड जशाच्या तसेंच कायम होते. त्यांना कोणी शिवलेंहि नव्हतें. सामानसुमान नीट बांधून आम्ही तें गाईच्या पाठीवर लादलें व दुसऱ्या दिवशीं सकाळींच परत फिरावयाचें असें ठरविलें. दुसऱ्या दिवशीं जातां जातां झाडावर दडवून ठेविलेलें हत्तीचे दोन्ही दांत घेऊन जाण्याचें ठरविलें. त्या झाडाची आठवण होतांच आम्हांला त्या भयंकर हत्तीची गोष्ट आठवून शरीरावर रोमांच उभे राहिले.

रस्त्यानें नानाप्रकारच्या आकारांचीं व रंगांचीं हरणें पहात

पहात आम्ही चाललों. झाडाझुडपांतून चाललों होतों तों एका-एकीं तोंडाला कमलेंसें एक बळकट जाळें आडकलें. तें काय आहे म्हणून पाहतों तर तें तेथील कोळ्यानें ( एक प्रकारच्या किड्यानें ) विणलेलें जाळें होतें. मोठें कठिण होतें. एक प्रचंड पिंवळ्या रंगाचा कोळी ( तो कीटक ) आपलें जाळें विणून झाडावर चढला होता. त्या जाळ्याच्या आसपास आणखीहि कांहीं जाळीं पाहण्यास मिळालीं. तीं जाळीं गोल वर्तुळाकार होतीं. त्यांची लांबी मोजली. ती सुमारें गजभर भरली. तीं जाळीं एका झाडापासून दुसऱ्या झाडापर्यंत विणलेली होती. जाळ्याच्या दोऱ्या एकाद्या जाड दोरीप्रमाणें जाड, मजबूत व कठीण होत्या.

आणखी एका झाडाखालीं आणखी एका प्रकारचा कोळी पाहिला. त्याचा रंग तांबडा होता. पूर्वी पाहिलेल्या कोळ्यांपेक्षां याचा आकारहि खूप मोठा होता. तो आपल्या उद्योगांत इतका गढून गेला होता व तो इतका कष्टिक होता कीं, त्याचा तो उद्योग पाहून मी अगदीं चकित होऊन गेलों. झाडाच्या एका ढोलींतून तो एकदम बाहेर आला आणि नंतर एक अचाट उड्डाण मारून त्यानें एका मोठ्या पतंगावर हल्ला चढविला. आणि पाहतां पाहतां त्याचा खावून अगदीं फन्ना उडविला. तसेंच तो कम-ज्यास्त वेगानें कधीं मागें तर कधीं पुढें ताड ताड उड्या मारीत हिंडूं लागला. तेव्हां मला अशी भीति वाटूं लागली कीं, न जाणों कदाचित् तो माझ्या अंगावर उडी घेऊन माझे डोळेबिळे फोडून खाईल. म्हणून मी थोडासा दूर अंतरावर उभा राहिलों. झाडाच्या नळाला एके जागीं पाहिलें तर तेथें एक खळगा होता. त्याच्या तोंडावर एक पांढऱ्या रंगाची झांकणी उपडी पडलेली होती. ती झांकणी रेशमाप्रमाणें मऊ अशा बारीक दोऱ्यांची होती. त्यावरून ओळखलें कीं, हें त्या कोळ्याचें घरटें आहे. तो घरांत असे तेव्हां ती झांकणी त्या खळग्याच्या तोंडावर झांकून

घेत असे. ती झांकणी ओढून काढण्याचा प्रयत्न केला तेव्हां ती एका अंगानें जमिनीशीं गळपट जोडलेली असल्याचें दिसलें. त्या झांकणीच्या वरच्या अंगास गवत, पाला पाचोळा व माती हीं बसविली होतीं यामुळें ती हुबेहूब जमिनीप्रमाणें दिसे. यामुळें ती झांकणी लावली गेल्यास ती जागा अगदीं साधारण जमिनी-प्रमाणें दिसे. वरून पाहणारास कोळ्याचें घरटें अमुक जागीं आहे असें ओळखतां येणें अगदीं अशक्य होतें. कोळ्याच्या अंगची ही बुद्धि पाहून मी आश्चर्यानें अगदीं थक्क झालों. वाटेंत आम्हांला कित्येक सापहि आढळले परंतु कृपा करून कोणीहि आम्हांला उपद्रव दिला नाहीं.

त्या दिवशीं रात्रीं एकाएकीं शिंगांचे खटाखट आवाज ऐकूं आले. जान म्हणाला, तो रानटी रेड्यांच्या टकरांचा आवाज. थोड्याशा वेळानें पुनः भयंकर रीतीनें फुस् फुस् आणि घों घों असा आवाज ऐकूं येऊं लागला. जान म्हणाला, रेडा आणि गेंडा यांची लढाई जुंपली आहे. मला भीति वाटूं लागली कीं, ते लढत लढत व दंगामस्ती करीत, तसेच आमच्या तंबूवर तर येऊन आदळ-णार नाहींत ना ? कदाचित् ते गाईच्या अंगावर येऊन पडले तर एका मिनिटांतच तिचा शेवट व्हावयाचा; अशी तिची अवस्था ! निजल्या निजल्याच पाहत होतों तों लांब अंतरावरून हत्ती टोळ्या टोळ्यनीं जात असलेले दिसले. त्यांना पाहून ताब-डताब उठलों आणि त्यांच मागोमाग चाललों. पाहतों तों ते सर्व एका तळ्याजवळ येऊन पोहोंचले आणि त्या तळ्याच्या चारी बाजूनें एकेक एकेक याप्रमाणें पाण्यांत उतरून शाळेंतील मुलांप्र-माणें त्यांत बुड्या मारूं लागले. अशा रीतीनें स्नान झाल्यानंतर प्रत्येकजण ‘ रूपांग् ’ ‘ रूपांग् ’ असा आवाज करून सोंडेनें पाण्याचा फवारा आपल्या अंगावर उडवूं लागला. त्यांचा हा स्नानविधि पाहण्याची मोठी मजा असते.

ज्या झाडावर हत्तीचे दांत दडवून ठेविले होते. त्याच्याखालीं

सकाळीं येऊन वर डाहळीकडे निरखून पाहूं लागलों कीं, दांत सुरक्षित आहेत कीं नाहींत. पाहतों तों डहाळीमध्यें पानांच्या झुपक्यांत कायसें हालतें आहे. तेव्हां नीट न्याहाळून पाहिलें तों एक चित्तावाघ झाडाच्या फांदीवर बसून माझ्याकडे टकमक करून पाहत आहे. तो कांहीं अगदीं लहान नव्हता बराच मोठा होता हत्तीच्या दातांना जें मांस लागलें होतें तें खाण्याकरितां तो झाडावर चढला होता; हें मीं ताडलें. तेव्हां तोच त्या झाडाचा मालक होता.तेव्हां त्याला खालीं उतरावल्याशिवाय तेथें जाण्याची माझी कांहीं ताकद नव्हती. म्हणून त्याला मारण्याचा बेत केला. चित्तावाघ झाडावरून उडी घेऊन अंगावर येईल हें मीं जाणून होतों. मी थोडासा दूर उभा राहून अगोदर कांहीं लांकडाचे तुकडे त्याच्या अंगावर फेंकिले. तेव्हा तो रागानें दांत बाहेर काढून माझ्याकडे पाहून गों गों असें शब्द करूं लागला. जान म्हणाला, आतां उगाच वेळ न करतां त्याला गोळी घालणेंच ठीक. तेव्हां बंदूक घेऊन वाघाच्या अंगावर गोळी तर सोडली. परंतु काय आमचें दुर्दैव, ती गोळी चुकली आणि वाघानें माझ्याकडे उडी घेतली. तेव्हां मी परत आलों. तरीहि भीति वाटूं लागली. तो थोडक्याच वेळांत आमचेवर हल्ला करणार परंतु काय आमचें सुदैव ! नीट न्याहाळून पाहतों तों झाडावरील कांहीं वेलींमध्यें वाघाचे पाय गुरफटून गेले होते. एका डहाळीवरून दुसऱ्या डहाळीवर आल्यामुळे पाय आडकून तो बसला होता, आणि रागानें अगदीं फुलून होता. ही संधि बरी आहे असें पाहून मी फेर गोळी झाडली; ती अगदीं बरोबर त्याच्या डोक्यावर जाऊन लागला. आणखी गोळी मारावी म्हणत होतों तों इतक्यात तो धडपड करून पटदिशीं खालीं जमिनीवर पडला आणि तात्काळ मेला. शिकार पुरी झाली कीं, प्रत्येक वेळेला जानला आनंद हा व्हावयाचाच. तो त्या वेळेपुरताच, मग पुढें कांहीं नाहीं. ह्याहि वेळीं तोच प्रकार. आम्हीं दोघांनीं वाघाचें कातडें

सोलून घेतलें. आणि नंतर झाडावर चढून दांत पाडून घेऊन गाईच्या पाठीवर लादले.

गाईचा बोजा वरचेवर वाढूंच लागला. व ती तर इतकी क्षीण व दुर्बल झाली होती कीं, माझ्या अंगीं शक्ति असती तर मी त्यांतले बरेंचसें ओझें स्वतःच वाहून नेलें असतें.

हळूहळू गाईला घेऊन काका जेथें होते तेथें यऊन पोहोंचलों. हरघटकेला मनांत येई कीं, आतां ही गाय मरून जाणार. काकांच्या जवळ जेंव्हां आलों तेंव्हां ते गाईची ती अवस्था पाहून अगदीं चकित होऊन गेले व फार कष्टी झाले. ओझें उतरून जान गाईला पाणी पाजण्याकरितां घेऊन जाणार, इतक्यांत ती जमिनीवर पडून धापा देऊं लागली व नंतर थोडक्याच वेळांत मरण पावली. जान व मी तिला ओढीत ओढीत फेंकून देण्यास नेत होतों. इतक्यांत तेथील कित्येक रानटी लोक आमचेकडे यऊन आम्हांला ती गाय मागूं लागले. त्याचें म्हणणें होतें कीं, तिला भाजून आम्ही पांचचार लोक त्यावर आजचें भोजन उरकूं. त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांना आम्ही ती गाय दिली.

काका म्हणाले, आपण नदीपार जाण्याकरितां गवतांच्या भाऱ्यांचा एक ताफा तयार केला आहे. त्यावरून आपलें सामानसुमान नेण्याची व्यवस्था करूं. आणखी दोन नांवा आणविण्याचें ठरविलें आहे. त्यांतून आपण पलीकडे जाऊं. आपल्याबरोबर तेथील दोन चार लोकांनाहि वाटाडे म्हणून बरोबर घेण्याचें ठरविलें आहे.

त्या दिवशीं रात्रीं सिंह किंवा हायेना यांचे चित्कार ऐकूं आले नाहींत. फक्त तेथील रानटी लोकांचें विकट हास्य मात्र ऐकूं येत होतें. मधून मधून त्यांचे चित्कार व गाणींहि ऐकूं येत ते गाईचें मांस शिजवून त्यावर ताव मारण्यांत या वेळीं गढून गेलेले होते.

सकाळीं कांहीं रानटी लोकांच्या साह्यानें आम्ही नदीमध्यें

आमचें सामानसुमान घेऊन गेलों. पाहतों तर तो गवताचा ताफाहि पुष्कळच मोठा होता. तो लांब लांब व जाड लांकडांनीं केलेला होता. नांवाहि होत्या. त्या ताफ्याला त्या रानटी लोकांनीं एक पाल लावून शीडहि उभारलें होतें. सर्व व्यवस्था बरोबर लागल्यावर आम्ही पलीकडे जाण्यास निघालों. तेव्हां कांठावर कित्येक लोक उभे राहून आम्हांला निरोप देत होते. व कित्येकजण आमचे वाटाडे बनून आमचे बरोबर येत होते.

त्या नांवेंतून वाहात वाहात जाण्याची मोठी मौज वाटूं लागली. मधून मधून कांहीं पाणहत्तीहि दिसले. पाण्यामध्यें मध्यंतरीच एखाद्या खडकाप्रमाणें ते प्रचंड प्राणी एकाएकीं वर येत आणि पुनः बुडी मारून खालीं तळाशीं जात. नांवेजवळून कित्येक मोठमोठ्या सुसरीहि वाहात गेल्या. त्यांतील कांहीं सुसरींनीं हळूंच डोकें वर काढून आपल्या गोल गोल डोळ्यांनीं आमचेकडे टकमक करीत पाहण्याची कृपाहि केली.

दुपारीं आमच्या वाटाड्यांना खाण्याची इच्छा झाली. म्हणून त्यांनीं नांव कडेला लावण्यास आणली. मजजवळ जे खाण्याचे पदार्थ होते, ते मी खाल्ले. नदीचें पाणी पाहून तें पिण्याची मला फार इच्छा झाली म्हणून हात पुढें करून नदींतील पाणी घेणार, तों समोरच एका सुसरीनें डोकें वर काढलें. तेव्हां आतां पाणी पिण्यांत अर्थ नाहीं. असें म्हणून हात आंखडून स्वस्थ बसलों. त्याच वेळीं आमच्या सामानाच्या गवती ताफ्याच्या बाजूसहि कांहीं सुसरींचीं डोकीं वर आलेलीं दिसलीं.

तें कांहींहि असो. आमचे वाटाडे जेव्हां जेवण करून नांवेवर परत आले तेव्हां माझी भीति दूर झाली नांव मोठ्या वेगानें चालली होती. बरोबर अशा वेगानें गेलों तर आम्ही फारच लौकर आपल्या इच्छित ठिकाणीं जाऊन पोहोंचूं, अशी आशा वाटूं लागली. इतकेंच काय पण संध्याकाळ होण्यापूर्वींच जाऊन पोहोंचलों असतों. परंतु तसें झालें नाहीं. वाटेंतच

आम्हांला संध्याकाळ झाली. तेव्हां ते रानटी वाटाडे म्हणाले कीं, आजच्या रात्रीं येथेंच उतरून आमच्या जातभाईचा एक गांव जवळच आहे; तेथें रात्र काढूं. आणि नंतर पुनः दुसरे दिवशीं प्रवासाला निघूं; आपण तेथें गेलों म्हणजे आपले जातभाई आपला फारच आदरसत्कार करतील. तें ऐकून आम्हीहि तेथें उतरण्यास कबूल झालों. कां कीं, नांवेंत रात्र काढण्यास गेलों आणि एकाद्या सुसरीच्या अथवा पाणहत्तीच्या भक्ष्यस्थानीं पडलों तर काय करावयाचें ?

जातां जातां दक्षिण दिशेच्या कांठावर आम्हाला मधमाशांच्या पोंवळ्याप्रमाणें कांहीं लहान लहान झोंपड्या दिसल्या. आमच्या वाटाड्यांनीं त्या बाजूला नांवा नेऊन भिडविल्या. आणि कांठावर आमचें सामानसुमान उतरून व त्यावर पाला झांकून तें एके जागीं ठेऊन दिलें. ते म्हणाले कीं, तुम्ही स्वस्थ असा. सामान चोरीस जाण्याची बिलकूल धास्ती बाळगूं नका. त्या लोकांनीं या वेळपर्यंत आमच्याशीं जें सत्वशीलतेचें व सभ्यपणाचें आचरण केलें होतें. त्यामुळें त्यांच्या बोलण्यावर अविश्वास करण्याला आम्हांला कांहींच कारण नव्हतें. ते लोक जरी रानटी होते तथापि त्यांच्यांत जे सद्गुण होते, ते पाहून आम्ही अगदीं मोहित होऊन गेलों होतों.

त्यानंतर ते आम्हांला एका नवीन झोंपडींमध्यें घेऊन गेले. ती बहुतेक वरवर खरडून साफ केली होती. त्यांत झाडपाल्याची एक प्रकारची चटई अंथरली होती. अशा सुंदर घरांत निजण्यास मिळणार, या आशेनें मला तर फारच आनंद झाला. पुष्कळ दिवसांत अशा प्रकारें आमचें दैव उघडलें नव्हतें. त्या दिवशीं आमच्या करतां एक मोठी सांड कांपण्यांत आली. त्यांतले कांहीं मांस भाजण्यांत आलें आणि कांहीं शिजविण्यांत आलें. जेवणाच्या वेळीं थोडेंसें भाजलेलें मांस आणि थोडेंसें शिजविलेलें मांस एका ताटांत घालून आमचा एक वाटाड्या

देऊन गेला. ते रानटी लोक तें मांस दोन्ही दोन्ही हातांनीं सर्वजण एकत्र मिसळून खाऊं लागले. तें खाद्य आम्हांला गोड लागलें नाहीं. आणि आम्ही तें खाणें सोईचें आहे असेंहि समजत नव्हतों. तें पाहून ते रानटी लोक खूब हंसून आमची थट्टा करूं लागले. तेव्हां आम्ही कसें तरी करून त्यांनीं दिलेलें तें खाद्य संपवून टाकिलें. त्यांनीं एक प्रकारची दारूहि आम्हांला प्याव-याला दिली. त्यानें थोडीशी गुंगी येत होती.

जेवण संपल्यानंतर आम्हांला एक प्रकारचा चित्कार ऐकूं आला. कित्येक कुत्रे भुंकत होते आणि त्याबरोबर कित्येक लोकहि ओरडत होते. ज्या दिशेकडून आवाज येत होता, तिकडे आम्ही गेलों. जाऊन पाहतों तों कांहीं लोक एका अग्निकुंडाच्या कडेवर वांकून, हातांत भाला घेऊन व पायांत घुंगरूं बांधून नाचत आहेत, आणि त्यांनीं तोंडानें मोरे ओरडण्याचा सपाटा लाविला आहे असें दिसलें. आणखी कित्येक लोक त्यांच्या मागो-माग नाचत होते. मुलींचा एक गोल होऊन गाणीं गात होता. आणि प्रत्येक तालावर टाळी देत होता. गांवांतील थोर थोर वृद्ध माणसें व पुढारी लांब बसून नाच पाहात होते, त्यांच्याजवळ जाऊन आम्ही बसलों. मुलांची एक टोळी नाचत नाचत केव्हां मुलींच्या जवळ तर केव्हां अग्निच्या जवळ येऊन उड्या मारीत होती. आणि खूब धुरळा उडवीत होती. पुरुष एकच कफनी नेसले होते. कफनीच्या खालचा घोळ थोडासा मागील अंगाला झुलत होता. मुलींनीं आपल्या इच्छेप्रमाणें एक प्रकारचे झगे घातले होते आणि डोक्यावर एक मुकुटाप्रमाणें टोपी चढविली होती. नाचणे व गाणें कांहीं वेळ झाल्यानंतर एक स्फुर्तिबाज मनुष्य ( तो बहुधा त्या नाचणाऱ्या मंडळीचा पुढारी असावा ) पुढें येऊन पळत पळत मुलीपर्यंत आला आणि त्यानें आगींतून एक लांकूड उचलून नेऊन एका जागीं ठेविलें. त्यानंतर त्याच्या चारी बाजूनें व त्यावरून त्यानें खूब उड्या मारल्या.

हें सर्व संपल्यानंतर सर्व लोक एका जागीं जूट बांधून उभे राहिले. जणूं काय ते युद्धांतून शत्रूला जिंकून आपल्या घरीं परत आले होते. गाईच्या शेपटीनें बनविलेल्या रुंद रुंद बरच्या ते योद्धयाप्रमाणें गरगरा फिरवूं लागले. एकदां ते हल्ला करण्याकरतां पळत पळत पुढे आले—नंतर जणुं काय शत्रू पक्ष चाल करून पुढें आला म्हणून पुनः हटत हटत मागें जाऊन एका जागीं उभे राहिले. आणखी ते आलेले पाहून मुली आव्हानाचीं गाणीं गाऊं लागल्या व त्यांना युद्ध करण्याविषयीं विनवूं लागल्या. हा देखावा फारच चमत्कारिक होता ! आम्ही फार वेळ जागूं शकलों नाहीं. त्यांच्या पुढाऱ्याला आम्हांला निजावयास जावयाचें असल्याचें कळविलें.तेव्हां त्यांनीं मोठ्या सभ्य रीतीनें व आदरानें त्या झोंपडींत आम्हांला नेऊन पोहोंचविलें.

सकाळीं आम्हीं पुनः निघालों. तेथून परत येण्यापूर्वी तेथील मुलींना स्वागतार्थ कांहीं आंगठ्या बक्षीस देऊन आलों. त्याहि खूब आनंदित झाल्या. नदींत पुनः पाणहत्ती, सुसरी वगैरे जलचर प्राणी पहात पहात चाललों. कांहीं कांहीं पाणहत्तींच्या पाठीवर त्यांचीं पिलें होतीं. तीं पाठ आंवळून बसली होती. नदीच्या कडेला कित्येक झाडावर सांपाप्रमाणें मोठ्या आकाराचे प्राणी होते त्यांच्या अंगावर कांटे होते. आम्हांला पाहून ते झपाझप पाण्यांत पडूं लागले. आम्हांला जरूरीमुळें लौकर जावयाचें नसतें तर आम्ही पाण्यांतून पुष्कळ दिवस प्रवास केला असतां कारण आम्हांला पाण्यांतून प्रवास करण्याची फार हौस होती

दिवस संपत आला. सायंकाळची वेळ झाली. दूर अंतरावर नदीच्या कांठीं कांहीं तंबू दिसले आम्ही बंदूकीचे वांझे बार काढले त्याबरोबर तंबूतून काकांच्या स्नेह्यांनींहि परत आवाज काढले. आम्हाला आश्वासन मिळालें. कांठाला आमची नांव येताच आम्ही पाहतों तों काकांचे स्नेही वेल्बर्न व त्यांचा मुलगा हॅरि हे आमचें स्वागत करण्याकरितां उभे होते.

# प्रकरण ६ वें.

## सुसरीचा हल्ला आणि हत्ती व गेंडा यांची लढाई.



काकांच्या स्नेह्यांजवळ दारूचा व गोळ्यांचा पुष्कळच सांठा होता. आणि आमच्याजवळहि जो संग्रह होता तो सर्व मिळून आमचा बाकीचा मार्ग चांगला संकटाशिवाय चालून जातां येईल, असें आह्मांला वाटलें. त्यांचें घोडे व गाई हीं चांगली तरतरित होतीं. ह्यावेळीं मार्गांत असंख्य हत्ती व हरणें हीं भेटणार होतीं यांत कांहीं शंका नाहीं. गाईंना हाकण्याकरितां तिघेजण तद्देशीय लोक व आणखी इतर बारा जण लोक ह्यावेळीं बरोबर होते. ह्यावेळीं एका शिकारी मनुष्याचीही आमच्यांत भर पडली. काकांच्या स्नेह्यांनीं त्याला समुद्र किनाऱ्यापासून आणले होते. त्यांचें नांव होतें हॉन्स. आतां जानच्या जोडीला हॉन्सही येऊन मिळाला. हॉन्स हा शिकारीच्या कामांत मोठा वस्ताद होता. तद्देशीय पंधरा माणसामध्यें एकजण विशेष प्रमुख होता. त्याचा चेहरा नीटस, आणि शरीराचा बांधा डौलदार होता. काळ्या रानटी लोकांमध्यें तो बराच सुंदर दिसत होता. त्याचें नांव होतें टोको. चांगले घोडे, विपुल दारू आणि जवान शिकारी हीं बरोबर असल्यामुळें मला फारच आनंद वाटत होता. कारण आतां आपल्या इच्छेप्रमाणें आपण वाटेल तिकडे शिकार करीत करीत जाऊं आणि त्यांत खूब मजा येईल, असें मला वाटूं लागलें.

आमच्या तंबूच्या जवळच एक लहानशी नदी होती. एके दिवशीं हॉरी व मी हॉन्सला बरोबर घेऊन तिच्या कांठीं गेलों.

झाडाच्या डहाळीवर चढून पाण्यांत उड्या माराव्या असा आमचा बेत होता. हॉरीला मी विचारलें कीं, नदींत सुसरी आहेत कीं नाहींत ! तो ह्मणाला, नाहींत. ह्मणून मी साहस करून नदींत उतरण्यास गेलों. तों अरे बाप रे ! आम्ही पाण्यांत उडी घेणार, इतक्यांत डाव्या बाजूकडून एका माणसाची किंकाळी ऐकूं आली. मला वाटलें, आमच्यापैकीं कोणी तरी एकाद्या प्राण्याच्या दाढेंत सांपडला खास. माझ्याजवळ एक लांब-लचक सुरी होती. ती काढून घेऊन मी त्या बाजूला पळालों. जाऊन पहातों तों आमचा शिकारी हॉन्स, पाण्याच्या किनाऱ्यावर पालथा पडला असून डाव्या हातानें त्यानें एका झाडाला धरलें आहे व त्याचा उजवा हात एका सुसरीनें पकडला असून ती त्याला पाण्यांत ओढीत आहे व त्यामुळें तो दुःखानें किंकाळ्या फोडीत आहे असें दिसलें.

काय उपाय केला असतां त्याचें रक्षण करतां येईल तें मला बरोबर समजेना. एकाएकीं मला युक्ति सुचली. त्यानें डाव्या हातानें ज्या झाडाला धरलें होतें त्यावर मी चढलों आणि सुरी बाहेर काढून ती त्या सुसरीच्या डोळ्यांत मी एकदम जोरानें खुपसली. त्याबरोबर सुसरीनें रागानें खिस करून जबडा पसरला. तेव्हां हॉन्स तात्काळ तिच्या तावडींतून सुटला, आणि चटकन् तो झाडावर चढून बसला. मीही ताबडतोब झाडावर चढलों. सुसरीनें खालच्या बाजूला थोडा वेळ धुडकूस घातला. तिनें इकडे तिकडे जोरानें सुसांड्या मारल्या व शेवटीं तिनें शेपटीचे झपाटेहि दिले. माझें आंग कांपूं लागलें, तेव्हां मी खालीं पडणारच होतो परंतु थोडक्यांत बचावलों. आश्चर्य हें कीं, सुरीच्या आघातानें त्या सुसरीला अशी जखम झाली होती कीं नंतर थोड्याच वेळानें तिचा देह पाण्यावरून वाहात चाललेला दिसला.

आम्ही संकटांत आहों, असें पाहून काका पळत पळत

जवळ आले, हॅन्सला धरून त्याला हळूच झाडावरून खालीं उतरण्यांत आलें. तो तेव्हां कांपत होता. त्याचें शरीर त्यावेळीं त्याच्या अगदीं स्वाधीन नव्हतें. तो जमीनीवर थोडा वेळ गपचीप बसून राहिला. काकांनीं त्याचा हात पाहिला. तो बराच कापला गेला होता पण कोणतेंहि हाड मोडलें नव्हतें. त्याच्या हाताला औषधपाणी करून त्याचें समाधान करण्यास बराच वेळ लागला.

आमच्याजवळचे हत्तीचे दांत होते ते व्यापाराचे पदार्थ विकत घेण्यांत बहुतेक संपले होते. ह्मणून आम्ही असें ठरविलें कीं, ह्यावेळीं अशा जागीं गेलें पाहिजे कीं, जेथें हत्तींचा अड्डा आहे, आणि जेथें शिकार करण्यास फारच थोडे लोक गेले आहेत. ह्याकरितां आह्मी उत्तर–पूर्व दिशेला निघालों. त्या बाजूला ज्या रानटी लोकांची गांठ पडली, ते फारसे दुष्ट स्वभावाचे नव्हते. तें रानटी खरें, परंतु अगदीं निरुपद्रवी होते. त्यांचें मन अज्ञानानें व कुसंस्कारांनीं पूर्ण ग्रासलेलें होतें.

कांहीं ही असो. आह्मी मागें एक गाय घेऊन किती कष्टानें मार्ग चालत होतों ! परंतु ह्यावेळीं स्नेहीसोबती व भरपूर वाहनें घेऊन अम्ही एकाद्या राजेरजवाड्याप्रमाणें चाललों होतों.थोडें पुढें येतों न येतों तोंच मार्गांत ठिकाठिकाणीं हरणांचे मोठमोठे कळप व रानटी रेडे दृष्टीस पडूं लागले. दुसऱ्या दिवशीं झेब्रा प्राण्यांचा एक तांडाहि नजरेस पडला. तेव्हां यापुढें मला लोभ आवरणें अशक्य झालें. ह्मणून मी हातांत बंदूक घेऊन त्यांच्याकडे चाललों. त्यांना तें कळलेंहि नाहीं. जवळ येऊन एकाला गोळी मारतांच बाकीचे भीतीनें पळून गेले. आणि जखमी झालेला झेब्रा आमच्या-तंबूच्या बाजूला जातांच आमच्या कांहीं लोकांनीं त्याला चोहों-कडून घेरून मारून टाकिलें. जरासा पुढें जाऊन पाहतों तों एक रेडा मी ज्या बाजूनें येत होतों, त्याच बाजूकडून माझ्याकडे पळत येत होता.रानटी रेडे कसे रागीट असतात तें मला माहीत होतें.

त्यामुळें त्याला मारणची व्यवस्था न केल्यास त्याच्या तावडींतून सुटण्यास अन्य मार्ग नाहीं.—असें जाणून मी बंदूक तयार केली. त्याच्या डोक्यावर गोळी मारल्यास त्याला लागणार नाहीं अशा भीतीनें मी थोडासा अळंम टळंम करीत होतो. तो रेडा एका झुडपापासून वळून मजकडे येतों आहे, तोंच मी त्याच्या खांद्यावर गोळी घातली. त्याला गोळी मारल्यानंतर ताबडतोब मी जमीनीवर लांब होऊन पडलों. तेव्हां तो रेडा पळत पळत माझ्या पाठीवरून निघून गेला. आमच्या तंबूकडे जातांच तंबूंतील लोकांनीं ताबडतोब त्याचा शेवट केला.

टोको मजजवळ येऊन म्हणाला कीं, तुम्ही एकटें शिकारीला जात जाऊं नका. त्यामुळें तुमचें एकंदरींत बरें होणार नाहीं का कीं, येथें गेंडे वगैरे प्राणी आहेत. ते आंगावर आल्यास व गोळी चुकल्यास मग प्राणरक्षण करतां येणें कठीण. तेव्हां असें ठरलें कीं, शिकारीला जाण्याच्या वेळीं टोकोनें बरोबर असावयाचें.

आमचा असा नियम होता कीं, अशा जागीं तंबू ठोकावयाचा कीं, जेथें जवळ पाणी असेल आणि जेथे नाना प्रकारचे प्राणी शिकारीला मिळतील. कधीं कधीं आम्ही दोन तीन दिवस एकें जागीं राहात होतों. इतक्या दिवसामध्येंच हॉरिशीं माझी खूब गट्टी जमली होती. टोकोला घेऊन आम्ही दोघेंच बहुधां शिकारीला हिंडत असूं.

एके दिवशीं आम्ही तिघेजण पायींच शिकारीला निघालों. बरोबर आम्ही घोडे घेतले नव्हते. एका झाडीच्या काठीं येऊन तिघेजण तीन बाजूस गेलों. परंतु आम्ही असें ठरविलें होतें कीं, कोणीहि कोणापासून फार लांब जावयाचें नाहीं. आणि इतक्याजवळ असावयाचें कीं, एकानें हाक मारतांच दुसऱ्याला ती ऐकूं आली पाहिजे व त्यानें त्याला उत्तर देऊन जवळ आलें पाहिजे. मी मध्यभागीं गेलों, टोको डावीकडे गेला आणि हॉरीनें उजवी कडचा रस्ता सुधारला.

थोडेसें एकेकटें पुढें गेल्यानंतर टोकोचा चित्कार ऐकू आला कीं, " हत्ती हत्ती " मी ताबडतोब त्याच्याकडे चाललों. मी "हत्ती हत्ती" असें ओरडून हॅरीला सूचना केली. परंतु त्याच्याकडून कांहींच उत्तर मिळालें नाहीं. थोडेसें पुढें जाऊन पाहातों तों टोको एका झाडावर चढून बसला आहे असें दिसलें. तो मला खुणावून एकाद्या झाडावर चढण्यास सांगूं लागला. त्याच्या म्हणण्याप्रमाणें मी पळत पळत एका झाडाकडे जात आहे तों इतक्यांत पायांत कसलीशी वेल अडकली आणि मी धाडकन् खालीं पडलों. बंदूकही हातांतून निसटून गेली. त्या वेलींतून पाय काढण्याचा मी पुष्कळ प्रयत्न केला. परंतु तों अगदीं व्यर्थ झाला. माझ्या घोट्याला भयंकर वेदना होऊं लागल्या. तेव्हां मला वाटलें कीं, एकादें हाड मोडलें असेल. म्हणून मी टोकोला मला साहाय्य करण्याकरितां हाका मारूं लागलों. त्याच्याकडे पाहतों तर तो त्या झाडावरून थोडासा हाललाहि नाहीं. केवळ तेथें बसून तो गप्पा सांगूं लागला. समोर नीट न्याहाळून पाहतों तों एक प्रचंड हत्ती सोंड उचलून झाडाच्या आडून चालला होता आणि त्याच्या उलट बाजूच्या झाडींतून एक सिंह येत होता. माझ्या तोंडचें पाणी अगदीं पळालें. मी जिवाची आशाही सोडली. पुनः असा विचार आला कीं, आतां सिंह तरी मला खाऊन टाकील किंवा हत्ती तरी माझा चेंदामेंदा करून निघून जाईल. टोको झाडावर गपचीप बसला होता. पाहतों तर त्यानें सिंहाच्या डोक्यावर नेम धरून गोळी सोडली. बंदुकीचा आवाज ऐकून हत्ती एकदम भडकला व तो माझ्या जवळूनच चिर चिर करीत जंगलामध्यें निघून गेला. टोको झाडावरून उडी मारून खालीं आला. सिंहाकडे पहातों, तर त्याचा प्राण थोडासा धुग् धुग् करीत होता. टोकोनें मला तेथून उचलून दुसरीकडे लांब अंतरावर नेऊन ठेविलें, आणि तो परत आला. नंतर त्यानें सिंहाला पुनः एक गोळी घालून पुरें केलें. इतक्यांत बंदुकीचा आणखी एक

आवाज ऐकूं आला. तेव्हां मी ताडलें कीं, हॅारी आम्हाला हुड-कीत आहे.

टोको मला तावडतोब एका सुरक्षित ठिकाणीं ठेवून हॅारीकडे गेला. टोको निघून गेल्यानंतर त्या हिंस्र प्राण्यांनीं भरलेल्या जंग-लांत निजलों असतां, माझें काळीज धडधडूं लागलें. कारण एका दृष्टीनें त्यावेळीं मी अगदीं असहाय आणि असमर्थ होतों ! एकादें जनावर अंगावर आलें असतें तर मी आपलें रक्षणही करूं शकलों नसतों. निजल्या जागींच मला मरणें भाग होतें. आतां टोको व हॅारी लौकर आले तरच माझें रक्षण होण्याची कांहीं आशा होती.

मी बंदूक हातांत धरून सिंह व्याघ्रादि पशूंच्या भीतीनें पडून राहिलों होतों. हॅारी काय करीत होता तेंही बरोबर कळलें नाहीं. मधून मधून बंदूकीचे आवाज व हत्तीचे चित्कार ऐकूं येत होते. तेव्हां मी ताडलें कीं, हॅारी आणि टोको त्या हत्तीलाच मारीत आहेत. पुढें क्रमाक्रमानें हत्तीचा आवाज माझ्या बाजूला ऐकूं येऊं लागला. व झालेंही तसेंच. माझ्या समोर एका मोकळ्या मैदानांत हत्ती येऊन उभा राहिला. तो माझ्या अंगावर येऊन पडता तर मी जागच्या जागींच गार व्हावयाचा ? नंतर थोड्या-शा वेळानें पाहतों तर एक प्रचंड गेंडा डाव्या बाजूकडील जंग-लांतून बाहेर आलेला दिसला. हत्ती त्याला पाहून चपापून उभा राहिला. जणूं काय अशा एका बलिष्ठ शत्रूंशीं लढण्याची आप-णांला इच्छाही नाहीं व तसें आपलें सामर्थ्यही नाहीं, असें त्यानें दाखविलें. परंतु गेंडा त्याला कां सोडील ? तो गों गों शब्द करीत हत्तीच्या पुढें आला. व जवळ येऊन डोकें हालवून त्यानें आपल्या डोक्यावरचें शिंग हत्तीच्या पोटांत खुपसलें. तेव्हां हत्ती बिचारा सोंड हालवूं लागला, आणि इकडे तिकडे धापा टाकूं लागला. तो जसजशी धडपड करूं लागला तसतसें गेंड्याचें शिंग जास्तजास्तच त्याच्या पोटांत खोल जाऊं लागलें. हत्तीची

ती दुर्दशा पाहून मलाही अत्यंत दुःख झालें. परंतु त्या दोन भयंकर जंगली प्राण्यांचें तें युद्ध कसें भयंकर होतें याची अगदी बरोबर कल्पना आणून देतां येणें अगदीं अशक्य होय. हत्तीचें केविलवाणें ओरडणें व चित्कार आणि गेंड्याचा गा गों असा ध्वनी यांनीं जणूं काय त्यावेळीं तें सगळें रान अगदीं हदरून गेलें होतें ! भीतीनें व विस्मयानें अगदीं स्तब्ध होऊन मी जेव्हां त्यांचें तें भीषण युद्ध पाहात होतों, तेव्हां कोणी तरी माझ्या पाठीवर मागाहून थाप दिली. तेव्हां दचकून मी मागें वळून पाहतों, तर माझा मित्र हॅरी असल्याचें दिसलें.



हॅरी व टोको यांना पाहून माझ्या जिवांत जीव आला. ते दोघे गडबडीनें मला कुशल प्रश्न विचारून लागलेंच त्या जनावरांकडे चालले. हॅरी थोडासा लांब उभा राहिला. आणि टोको एकप्रकारें त्यांच्या जवळ अगदीं पुढें जाऊन उभा राहिला. आणि त्यानें हत्तीच्या छातीवर गोळी मारली त्याबरोबर तो प्रचंड हत्ती गेंड्याच्या पाठीवर एकाद्या डोंगराप्रमाणें कोसळला. तेव्हां गेंडा एकप्रकारें अगदीं जमीनदोस्त झाला. हॅरी व टोको या दोघांनीं मिळून तेव्हां गेंड्याला कित्येक गोळ्या मारल्या. तो हत्तीच्या पोटाखालीं अगदीं दडपून गेला होता, त्यामुळें तो तेथल्या तेथेंच थोडा वेळ धडपड करून गपचीप पडला.

ह्या लढाईचा प्रसंग संपल्यानंतर हॅरीनें ठरविलें कीं, त्यांनीं दोघांनीं मला धरून नेऊन अगोदर तंबूंत सोडून यावयाचें आणि नंतर हत्तीचें दांत, सिंहाचें कातडें वगैरे नेण्याची तजवीज करावयाची. मी पाहिलें कीं, हेंच ठीक आहे. कां कीं, पायाची जखम काकांना दाखविणें जरूर होतें आणि तीही शक्य तितक्या लौकर दाखविणें चांगलें, असें मला वाटत होतें. त्यांनीं झाडाच्या दोन लांब डहाळ्या आणून, त्यावर आणखी लहान लहान डहाळ्या बांधून माझ्याकरितां एक अजब खाट तयार केली. या खाटेवर निजल्यावर मला वाटलें कीं आतां “ राम बोलो भाई ” म्हटल्यासही चालेल. परंतु तेव्हां माझें अन्नोदक संपलें नव्हतें. एवढेंच काय तें. टोको व हॅरी मला खांद्यावरून वाहून घेऊन चालले.

वाटेला हत्ती किंवा सिंह भेटल्यास संकटाला सीमाच राहणार नव्हती. गेंडा भेटल्यास तो अंगावर येणार नाहीं हें मी जाणून होतो. कारण त्याला आपण खिजविलें नाहीं तर तो आपल्या वाटेला मुळींच जात नाहीं. शिवाय माणसाला पाहून गेंडा भीतीनें तेव्हांच पळून जातो. आमचा जावयाचा रस्ताहि थोडाच होता. तरीहि अर्ध्या वाटेंत आलों आहों इतक्यांत थोड्याशा लांब अंत-

रावर एका झाडींतून एक सिंह बाहेर पडून रस्त्यावर आला. त्याची व माझ्या मित्रांची नजरानजर झाली. हॉरी व टोको मला ताबडतोब खालीं उतरून म्हणाले—,"भिण्याचें कांहीं कारण नाहीं. तूं येथें रहा. आम्ही तुझेजवळ उभे राहून तुझें रक्षण करतों."

मी म्हणालों,—"सिंह जवळ आला नाहीं तर त्याला मारूं नका. कां कीं, तो गोळीनें न मरतां जर केवळ जखमीच झाला तर रागानें तो माझ्यावरच उडी मारील."

सिंहानें आमच्याकडे थोडा वेळ टक लावून पाहिलें. पण जेव्हां आम्ही सर्वांनीं मिळून जोरानें चित्कार केला, तेव्हां सिंह कांहींसा विचार करून आस्ते आस्ते अरण्यांत निघून गेला. सिंह दिवसाढवळ्या मनुष्यावर फारसा हल्ला करीत नाहीं. त्यांतहि विशेषतः जर कोणी छाती करून मोठ्या धैर्यानें त्याच्यासमोर उभा राहिला तर तो त्याला पाहून भीतीनें पळून जातो. परंतु जर का कोणी पळून जाऊं लागला तर मग प्राणरक्षण होण्याचा कांहीं संभव नाहीं. तो त्याच्यावर हटकून हल्ला करणारच.

कांहींहि असो, मी पुनः त्या खाटेवर निजून तीवरून लौकरच आपल्या तंबूंत आलों. काका म्हणाले, पायाचें हाड मोडलें नाहीं. फक्त जोराचा मार लागलेला आहे एवढेंच. पायाला पाण्याची पट्टी बांधून मी निजून राहिलों. हॉरीला व टोकोला अरण्यांत जाऊन सिंहाचें कातडें व हत्तीचें दांत घेऊन येण्यास त्या दिवशीं झालें नाहीं. कां कीं, संध्याकाळ होऊन गेली होती. सर्व रात्रभर सिंहाच्या भेसूर गर्जना ऐकूं आल्या. हॉरी म्हणाला, आपल्या मृत मित्राच्या शोकानें ते रडत आहेत. कीट, पतंग, कुत्रे, पक्षी वगैरे नाना प्रकारच्या पाण्यांचे आवाजहि ऐकूं आले. सकाळीं उठून पाहतों तर माझा पाय बराच ओसरला होता.

खाण्याला मांस पाहिजे होतें, म्हणून सकाळीं हॉरि, हॉरीचे बाबा, व कांहीं शिकारी यांना बरोबर घेऊन काका आदल्या दिव-

साऱ्या मृत हत्तीचा शोध करण्यास निघाले. मी काकांची परवानगी घेऊन एका घोड्यावर बसून त्यांच्या बरोबरच चाललों. मी वास्तविक न जाणेंच चांगलें होतें. परंतु आदल्या दिवसाचा प्रचंड हत्ती व गेंडा पाहण्याची मोठी इच्छा झाली. त्या जागीं जाऊन पाहतों तर, गेंडा मुदलींच नाहीं ! सर्वजण गेंडा कोठें आहे, गेंडा कोठें आहे, म्हणून त्याला हुडकूं लागले. तेव्हां असें कळलें कीं, कालच्या गोळ्यांनीं गेंडा मेला नाहीं, तो केवळ भीतीनें गपचीप पडला होता मात्र. त्यानंतर योग्य संधि मिळताच तो पळून गेला.

टोको मोठ्या उत्साहानें त्याला इकडे बघ, तिकडे बघ, असें करीत शोधूं लागला. हेतु हा कीं, कदाचित् तो आजूबाजूला सांपडेल. बाकीचे लोक सिंहाचें कातडें सोलूं लागले. माझें लक्ष होतें टोकोकडेस. पाहतों तों तो एका झाडीमध्यें डोकावून पाहून चित्कार करीत पळून आला. आणि बहुतेक त्याच्याबरोबरच एक मोठा प्रचंड गेंडा त्या झाडींतून बाहेर आला. टोको एका झाडाकडे पळाला. परंतु झाडाजवळ जातों न जातों तोंच, गेंडा मोठ्या जोरानें त्याला मारण्याकरितां त्याच्या अगदीं जवळ आला. टोको झाडावर उडी मारून चढणार, तोंच गेंड्यानें मागल्या बाजूनें येऊन डोक्यानें त्याला एक धक्का मारून वर फेंकून दिलेंहि. त्यानंतर तो काकांचेकडे मारण्यास धावला. मी चित्कार करून त्यांना सावध केलें. तेव्हां काकांनीं बंदूक घेऊन त्याच्या डोक्यावर गोळी झाडली. त्याबरोबर तो गेंडा तात्काळ मरण पावला.

मी घोड्याला टांच मारून तात्काळ टोकोकडे गेलों. मला वाटत होतें कीं, त्याचें हाडबिड मोडलें असेल. जाऊन पहातों, तो तो आपलें अंग झाडून उभा आहे. तो म्हणाला, आपणाला विशेष कांहीं लागलें नाहीं, तो येऊन मंडळींत मिसळलाही. गाईच्या पाठीवर हत्तीचे दांत व हत्तीचें मांस लादण्यांत आलें. थोडेंसें गेंड्याचें

मांस कापून सिंहाच्या कातड्यांत घालून नेण्यांत आलें. गेंड्याचें मांस खाण्यास चांगलें रुचकर लागलें. त्याच्या खांद्याचें व बरगड्याचें मांसच आम्ही नेलें होतें. त्याचें थोडेसें कातडेंहि आम्ही नेलें. त्याचा गाईला हांकण्यास चाबूक करावा असा हेतु होता. त्याचीं दोन्ही शिंगेंहि घेतलीं. त्यांची किंमत हत्तीच्या दातांच्या निम्पट येते. एकंदरींत त्या दिवसाची शिकार संकटमय झाली असतांहि आम्हांला तींत फायदाहि पुष्कळ झाला.

---

# प्रकरण ७ वें.



## सिंहांचा कळप आणि बेडकांची झडप.



त्या दिवशीं रात्रीं आगंतुक सिंहांच्या ज्या भयंकर गर्जना ऐकूं येऊं लागल्या त्यावरून आम्हांला असें वाटलें कीं, आतां जवळ आसपास आम्हांला फारशी शिकार मिळणार नाहीं.कां कीं, शिकारीला गेल्यास संकटें कांहीं कमी येणार नाहींत. तर तीं बरींच वाढणार. म्हणून दुसरे दिवशीं आम्ही तंबू उपटून घेऊन उत्तर दिशेकडे निघालों. जागोजाग लहान लहान डोंगर होते. ते डोंगर फारसे उंच नव्हते तथापि त्यांच्यामधून जे रस्ते गेले होते ते मोठे भयंकर होते. त्यांच्या दोन्ही अंगाला कित्येक लहान लहान झाडें होतीं. कोठें कोठें मोठमोठीं झाडेंहि होतीं. तेथील रहिवाशी लोक आमच्यावर हल्ला करतील अशी आम्हांला बिलकुल भीति नव्हती. तरीहि आम्ही पुढें आमचे हेर पाठवून ठेवीत असूं.

टोको नेहमीं आमच्या पुढें जात असे. एकाएकीं तो पळत येऊन आम्हांला म्हणाला—" मी आज एक मोटी आश्चर्यकारक गोष्ट पाहिली. "

काका म्हणाले—कसली?

तो म्हणाला—सिंहाचा एक मोठा कळप पुढें आपल्या रस्त्यावर निजला आहे.

त्याबरोबर आम्ही आमच्या टोळीला उभे केले. चाकरमाणसांच्या ताब्यांत गाई व घोडे दिले आणि आम्ही सिंहाच्या कळपाकडे निघालों.

हॅरि म्हणाला—गोळ्यांनीं जर कांहीं झालें नाहीं तर त्यांना हुसकण्याचा आणखी एक उपाय आहे.

असें म्हणून त्यानें आपल्या सामानांतून कित्येक दारूचे बाण बाहेर काढून आणले.

त्यानंतर टोकोला पुढें घालून आम्ही त्याच्या मागोमाग चाललों. डोंगरांतील एक रस्ता ओलांडून एका उंच जागीं येऊन आम्ही पोहोंचलों. पाहतों तों लांब अंतरावर आमच्या थोडेसें खालींच कित्येक सिंह व सिंही आपलीं लहान लहान पिलें घेऊन निजलीं आहेत. इतके सिंह एके जागीं कशाकरितां येऊन निजले होते तें जाणणें कठीण. आम्ही ही स्थिति न जाणतां सगळे जण येथें येऊन एकदम पोहोंचतों तर काय संकट ओढवलें असतें कोण जाणें. आम्हांला वाटलें कीं, त्यांनीं आम्हांला पाहिलें असावें. कां कीं, ते आपल्या शेंपट्या आपटूं लागले आणि त्यांतील पुढारी सिंह मोठमोठ्यानें गर्जना करूं लागले. तें संकट कांहीं सामान्य नव्हतें. तथापि त्यामुळें भिणारीं माणसें आम्ही नव्हतों. आम्ही पुढें जाऊं लागलों. हॅरीनें व मी सोडण्याकरितां कांहीं बाण तयार करून घेतले. आम्हीं पुढें जातां जातां चित्कार करूं लागलों. आमच्या चित्कारांच्या उत्तरार्थ तेहि गर्जना करूं लागले व फारच चंचल झाले.

काका म्हणाले—आतां विलंब लावण्यांत अर्थ नाहीं. तिघे तिघेजण गोळ्या झाडूं या.

तिघांनीं गोळ्या मारावयाच्या आणि दुसऱ्या तिघांनीं गोळ्या भरावयाच्या असा क्रम ठरविला. गोळ्या झाडल्यानंतर धूर साफ नाहींसा होतांच पाहतों तर ते जाग्यावरून हाललेहि नाहींत व थोडेसुद्धां डगमगलेहि नाहींत असें दिसलें. तेव्हां आम्ही एक बाण सोडण्याचा बेत केला. एका उंच जागीं आम्ही बाण पुरला. हेतु हा कीं, तो पेटवून सिंहाच्या बाजूला सोडावा. इतक्यांत आणखी एक वेळां गोळीबार करतांच दोन सिंह खूब जखमी

झालेले दिसले. परंतु इतकें झालें तरीहि ते पळाले नाहींत. तेव्हां आम्ही बाण पेटवून सिंहामध्यें सोडून दिले. त्याचा परिणाम मोठा अद्भुत झाला. भीतीनें सर्व सिंह ज्याला जिकडे मार्ग सांपडला तिकडे पळाले. कोणी कोणाकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं. एक सिंह लंगडा होऊन तेथेंच पडून राहिला. आणि दुसरे दोन लांब जाऊन पडले. बाकीचे सर्व दृष्टीच्या टप्प्याबाहेर निघून गेले. जे तीन सिंह जखमी झाले होते त्यांना गोळ्या घालून आम्ही त्यांना दुःखांतून कायमचें मुक्त केलें. त्यानंतर ताबडतोब त्यांचें कातडें काढून घेऊन आम्ही परत फिरलों. आम्ही कांहींसें दूर जातों न जातों तोंच असें दिसलें कीं, तेथील नाना प्रकारची गिधाडें उडून येऊन, त्या सिंहाची सद्गति करूं लागलीं.

आम्ही जेथें गाई आणि घोडे हीं ठेऊन गेलों होतों, तेथें फिरून परत आलों. डोंगरावरील रस्त्यावरून येतांच समोर मोठमोठ्या हरणांची एक टोळी दृष्टीस पडली; तिच्या आरंभाला एक मोठा धिप्पाड हरिण होता. तो हरिण इटकरी रंगाचा असून त्याच्या दोन्ही शिंगाला मधून मधून गांठी होत्या. काकांनीं पुढें सरून समोरच्या दोन एक हरणांना गोळ्या मारिल्या. परंतु त्यामुळें बाकीच्यांना फारशी भीति वाटली नाहीं. ते ताबडतोब आपली जूट बांधून निर्भयपणानें पुढें येऊं लागले. पण आम्ही दोन एक हरणें मारतांच ते आपली फळी फोडून पळाले. मेलेल्या हरणांचीं कातडीं व शिंगें काढून घेऊन आम्ही पुढें निघालों.

ह्या वेळीं आम्ही ज्या अंगाला रानटी हत्तींचा अड्डा होता तिकडे निघालों. आमचा उद्देश होता कीं, हत्तींचे दांत पुष्कळच पैदा करावे आणि जर संकटें फारशीं आलीं नाहींत तर गेंड्याचीं शिंगें व कातडीं आणि उंट पक्ष्यांचीं पिलें व पंख हींही मिळवून घेऊन जावयाचें.

जातां जातां आम्ही एका विशिष्ट जागीं जाऊन पोहोंचलों. तेथें लहान लहान डोंगर होते आणि चोहींकडे लहान लहान

टेंकड्याप्रमाणें मुंग्यांचीं वारुळें होतीं. त्या टेंकड्यांना काफिर लोक मलोप्पि म्हणतात. पाऊसाचें पाणी जमून तेथें एक लहानसें तळें तयार झालें होतें. आम्ही तेथें तंबू ठोकिला जाननें त्या नळ्यांतून कित्येक मोठ मोठीं बेडकें धरून आणिलीं. त्यांतून त्या दिवसाच्या स्वयंपाकासाठीं एक बेडूक कापला तों त्याच्या पोटीं पहातों तर उंदीर निघाला, व दोन तीन मोठमोठ्या मुंग्या आढळल्या आणि कित्येक कीट पतंगहि सांपडले.

सकाळीं आमच्या टोळींतील कांहीं लोकांनीं येऊन अशी बातमी दिली कीं, तळ्याच्या कांठीं सर्व रात्रभर सिंहाची गर्जना ऐकूं येत होती. सिंह अवचित् एखादे वेळीं आमच्या अंगावर येऊन पडेल, या भीतीनें आम्ही बंदूक घेऊन त्याला ठार मारण्याकरितां बाहेर पडलों. जेव्हां आम्ही तळ्याच्या कांठीं गेलों तेव्हांहि तो आवाज ऐकूं येत होता. जवळच एकाद्या झाडीच्या आड सिंह दडलेला असावा असा विचार करून आम्ही त्या जंगलांतून त्याला हुसकण्याचा प्रयत्न करूं लागलों. परंतु सिंह कोठेंच आढळेना. शेवटीं हॉरि खो खो शद्ब करून मोठ्यानें हसूं लागला. त्यानें तळ्याच्या दुसऱ्या बाजूकडे हात करून असें दाखविलें कीं, एक प्रचंड बेडूक झाडपाल्यावर डोकें उंच करून व गळा फुगवून खूप मोठ्यानें ओरडत आहे. बेडूक महाराज सिंहाप्रमाणें आपलें शरीर अक्राळ विक्राळ जरी करूं शकले नव्हते तरीहि त्यांनीं त्याच्या आवाजाची नक्कल अगदी हुबेहुब केली होती. तंबूकडे परत जातांना सर्व रस्ताभर हसतां हसतां आमची मुरकुंडी वळून गेली.

एक तर खुल्या जागीं सिंह बहुतेक येत नाहीं. आणि आलाच तर तो तेथें फार वेळ राहात नाहीं. आमच्यापैकीं एक इसम एक प्रचंड बेडूक धरून घेऊन आला. त्याला मोजून पाहिलें तेव्हां तो लांबीला नऊ इंच व रुंदीला साडे पांच इंच भरला. त्याचे मागचे पाय पाहतों तर त्याच्या एका बोटापासून दुसरें बोट अटरा इंचा-

वर असल्याचें आढळलें. त्याला कापून पाहिलें तेव्हां त्याच्या पोटांत पक्ष्याचें एक पिल्लूं सापडलें.

इतक्या दिवसाच्या सरावानें मला चालण्याचा चांगला अभ्यास झाला होता. तेव्हां मी हॉरीशीं असा करार केला कीं; आणखी एक दिवस त्याप्रमाणेंच शिकारीस बाहेर जावयाचें. त्या वेळीं फक्त जानला बरोबर घ्यावयाचें.परंतु जाण्याच्या वेळीं हॉन्स-हि येऊन मिळाला. काका, काकांचे स्नेही व टोको कांहीं तद्देशीय सोबती घेऊन दुसऱ्या एका दिशेला शिकारीला गेले. बारा मैल अंतरावर उत्तर दिशेला आणखी एक तळें होतें, तें तळें सोडून इतर ठिकाणीं न जाण्याविषयीं काकांनीं मला बजाविलें होतें. थोडेंसें दूर गेलों तेव्हां कसलाहि प्राणी दृष्टीस पडला नाहीं. तथापि हरिण, रेडे व हत्ती यांच्या पायांच्या खुणा मात्र अनेक ठिकाणीं दृष्टीस पडल्या. त्या प्रदेशाला मी जितका ओळखीत होतों तितके हॉन्स व जानहि ओळखीत होते. कारण ते यापूर्वी इकडे आले नव्हते. तथापि, तिकडे आम्ही चाललों होतों ते तसेंच चाललों होतों. त्या तळ्याकडे जावयाचें असा मनांतला हेतु होता. एखादें जनावर पाणी पिण्यास आलें कीं त्याची शिकार करावयाची असा बेत होता.

माझ्या बरोबर खाण्याचे पदार्थ थोडेसेच होते. आम्हाला आशा होती कीं, वाटेला प्राण्यांचें मांस व फळफळावळ मिळेल. शिवाय ती जागा पाहून असें वाटत होतें कीं, तेथें टरबुजांना कांहीं वाण पडणार नाहीं. परंतु सगळेंच ओंफस. नंतर थोडक्याच वेळानें आकाशाची स्थिति फार झपाट्यानें पालटूं लागली. काळे काळे ढग येऊन, आकाशांत जमले. आणि चोहोंकडे दाट छाया पसरली. या जागीं एक प्रकारचा अंधार नेहमींच पडतो.तेव्हां आतां पुढें जावें कीं, पुनः परत जावें असा मला विचार पडला. परत जाण्याच्या मार्गावर खाण्यास कांहीं मिळावयाचें नाहीं याचा येतांना आह्मांला अनुभव होताच. ह्मणून आतां पुढें गेल्यावर जर कांहीं

मिळाले तर चांगलेंच असें आह्मांला वाटलें. पाऊस बिऊस होईना का बापुडा. पोटास मिळाल्यास पाठीवर हवें तितकें सोसूं असें ह्मणून पुढें निघालों. पुढे जाण्याच्या कामीं जानला तर मोठा उत्साह वाटे. तो ह्मणे,—"चल रे बाबा, चल."

मेघाच्या कृपेनें सूर्य झांकला गेला. आमचीहि रस्ता चालण्याची चांगली सोय झाली. एके जागीं आल्यावर मला वाटलें कीं, सरोवर अगदीं जवळ आलें. जान एका प्रचंड झाडावर चढून चोहोंकडे निरखून पाहूं लागला. परंतु त्याला पाणी कोठें आढळेना.

पुनः आह्मी पुढें चाललों. शेवटीं येऊन एका डोंगराच्या कांठीं हजर झालों. डोंगरावर चढून आह्मी चोहींकडें पाहिलें, पण त्याच्या दक्षिण, उत्तर, पूर्व किंवा पश्चिम कोणत्याहि दिशेला पाणी दिसेना. आह्मांला थोडीशी भीति वाटली. तेव्हां भूक व तहान दोन्हीहि वाढली होती. बरोबर बाटलीमध्यें जें पाणी होतें तें संपून गेलें होतें. मला एकाएकीं असें भासलें कीं, आपण एका तळ्याच्या कांठीं आलों आहों. त्याच्या आजूबाजूस पाहतों तर हरणाप्रमाणें दोन प्राणीहि दिसले. हॅरी आणि मी ते दोन प्राणी मारण्यास गेलों आणि जान व हॅान्स पाण्याचा शोध करण्यास गले. पाणी मिळाल्यास त्यांनीं डोंगरावरच्या माचीवर यावें व मीहि नंतर तेथें हजर व्हावें असें ठरलें.

डोंगर, झाडी व उंच उंच गवतांचें जंगल यांतून जातां जातां आह्मी त्या दोन प्राण्यावर नजर ठेऊन चाललों. हॅरि म्हणाला, त्यांना अरेबिस् म्हणतात. ते इतक्या लांब लांब अंतरावरून जात होते कीं, त्यांना गोळी मारणें अगदीं अशक्य आहे, असें वाटे. जातां जातां ते मधून मधून आकाशांत कित्येक फूट उंच उडी मारून पुढें जाऊन पुनः चालूं लागत.

हॅरि ह्मणाला,—" जरा थांब. त्यांना मारण्याची एक युक्ति

ओलावा नव्हता. हॅरी तर मांस फेंकून देऊन म्हणाला— मला जरूर नाहीं या मांसाची. ते दोन्ही चाकर आतां परत "येणार नाहींत तर मी यावेळीं पाण्याच्या शोधाला जाणार."

मी त्याला शांत करण्याचा प्रयत्न केला. मीही आंतल्या आंत तहानेनें अगदीं कासावीस झालों होतो. जर कां तेव्हां थोडेसें मोरींतील घाणेरडे पाणी मिळतें तर तेंही किड्यांनीं बुचबुचलेलें असतांही पिऊन आम्ही अगदीं पार करून टाकिलें असतें.

अग्नीच्या कांठीं अशा स्थितींत बंदूक हातांत घेऊन आम्हीं बसलों होतों, ते जणूं काय सिंहाच्या स्वागतासाठींच ! एकीकडे ताहान आणि एकीकडे सिंह; एकाएकी मनुष्याच्या पावलांचा आवाज ऐकूं आला. आम्हीं दोघेंही जोरानें चित्कार करीत उटलों. त्याचें उत्तरही मिळालें.

आम्हीं म्हणालों—पाणी मिळालें कां ? उत्तर मिळालें— "होय. चांगली जागाही आम्हीं पाहिली आहे. तेथें अनेक हत्ती आहेत. उद्यां तेथेंच शिकारीला जाऊं."

जान व हॅान्स जवळ आले. कातड्याच्या बाटलींतील पाणी हॅान्सनें हॅारीला दिलें व जाननें आपली बाटली मला दिली. तेव्हां घटाघट आम्हीं कांहीं पाणी प्यालों. पाणी अगदीं घाणेरडें होतें. कदाचित् त्यांत कित्येक किडेही असतील. तथापि त्यावेळीं तें जणूं काय अमृतच आहे असें वाटलें.

पाणी पाहून हॅारी म्हणाला—" यावेळीं आतां मांस खावूं या."

तेव्हां सर्वांनीं मिळून भोजन केलें. जेवल्यानंतर लगेच हॅान्स म्हणाला कीं, मला फार झोंप आली आहे असें म्हणून तो जमिनीवर लागलेंच झोंपीं गेला.

हॅारी म्हणाला—" रात्रीं एकानें कोणी तरी जागें राहून पाहरा केला पाहिजे. कारण मघांशीं जो सिंह गर्जना करीत होता तोच अवचित येऊन हजर झाला तर !"

हॅन्सनें त्याचें बोलणें हंसण्या वारीच उडविलें. परंतु थोड्या- वेळानंतर अगदीं नजीकच ती गर्जना ऐकूं आली. त्यामुळें सिंह महाराज येतात कीं नाहीं याबद्दल आणखी कोणची शंका राहिली नाहीं. आह्मी सगळेंचजण बंदूक घेऊन ऊभे राहिलों. आपलें संरक्षण करण्याकरितां त्याला मारणें भाग होतें. शिवाय त्याचें कातडेंहि नेण्यास हवें होतें. आह्मी सर्वजण एकदम पुढें सरसावलों. आमच्या अग्नीपासून थोड्याश्या लांबीवर एका लहानशा डोंगराची एक टेकडी होती. त्याच्याच वर येऊन सिंह आमच्याकडे पाहात होता. दिवसाच्या वेळीं इतकी माणसें एकत्र असलेलीं पाहून तो हवा तर पळूनहि गेला असता; परंतु रात्र होती ह्मणून त्याचें साहस वाढलें होतें. गुर गुर करीत करीत आणि शेपूट हालवीत हाल- वीत आस्ते आस्ते डोंगराच्या वरून तो आमच्या बाजूला उतरूं लागला. तेव्हां आह्मीं गोळ्या झाडावयाच्या असें ठरविलें. प्रथम हॅरी व जान यांनीं गोळ्या माराव्या आणि त्यांच्या गोळ्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं असें दिसल्यास मी व हॅान्स या दोघांनीं गोळ्या घालाव्या. असा क्रम ठरविला.

सिंह हळू हळूं पुढें येत होता. त्याचे प्रचंड केशर आणि त्याच्या जवळच त्याचें तें बारकुळें चपळ शरीर, हीं आम्हांस चांगलीं दिसलीं. दोन वेळां तो थबकून उभा राहिला. आणि त्या बरोबर त्यानें भयंकर गर्जनाहि केल्या. हॅरि व जान यांनीं बहुतेक एकाच वेळीं गोळ्या सोडल्या. परंतु त्यांच्या गोळ्यांचा कांहींच उपयोग झाला नाहीं. सिंहानें रागानें आमच्यावर उडी घेण्याची तयारी केली. तो उडी मारणार इतक्यांत मी व हॅान्सनें गोळ्या झाडल्या. ह्या वेळीं नेम अगदीं बरोबर लागूपडला. तो बिचारा थोड्या अंत- रावर धाडकन् पडून थोडीशीं धडपड करून मरून गेला. आम्हीं तेव्हां मोठ्यानें चित्कार करून आमचा जयध्वनि प्रगट केला.

त्यानंतर आम्ही अग्नीजवळ परत येऊन चांगल्या प्रकारें अग्नी पेटवून निजण्याची तयारी केली. या वेळीं आतां सावध झालों.

ओलावा नव्हता. हॅरी तर मांस फेंकून देऊन म्हणाला—मला जरूर नाहीं या मांसाची. ते दोन्ही चाकर आतां परत "येणार नाहींत तर मी यावेळीं पाण्याच्या शोधाला जाणार."

मी त्याला शांत करण्याचा प्रयत्न केला. मीही आंतल्या आंत तहानेनें अगदीं कासावीस झालों होतो. जर कां तेव्हां थोडेसें मोरींतील घाणेरडे पाणी मिळतें तर तेंही किड्यांनीं बुचबुचलेलें असतांही पिऊन आम्ही अगदीं पार करून टाकिलें असतें.

अग्नीच्या कांठीं अशा स्थितींत बंदूक हातांत घेऊन आम्हीं बसलों होतों, ते जणूं काय सिंहाच्या स्वागतासाठींच ! एकीकडे ताहान आणि एकीकडे सिंह; एकाएकी मनुष्याच्या पावलांचा आवाज ऐकूं आला. आम्हीं दोघेंही जोरानें चित्कार करीत उटलों. त्याचें उत्तरही मिळालें.

आम्हीं म्हणालों—पाणी मिळालें कां ? उत्तर मिळालें—"होय. चांगली जागाही आम्हीं पाहिली आहे. तेथें अनेक हत्ती आहेत. उद्यां तेथेंच शिकारीला जाऊं."

जान व हॉन्स जवळ आले. कातड्याच्या बाटलींतील पाणी हॉन्सनें हॅरीला दिलें व जाननें आपली बाटली मला दिली. तेव्हां घटाघट आम्हीं कांहीं पाणी प्यालों. पाणी अगदीं घाणेरडें होतें. कदाचित् त्यांत कित्येक किडेही असतील. तथापि त्यावेळीं तें जणूं काय अमृतच आहे असें वाटलें.

पाणी पाहून हॅरी म्हणाला—" यावेळीं आतां मांस खावूं या."

तेव्हां सर्वांनीं मिळून भोजन केलें. जेवल्यानंतर लगेच हॉन्स म्हणाला कीं, मला फार झोंप आली आहे असें म्हणून तो जमिनीवर लागलेंच झोंपीं गेला.

हॅरी म्हणाला—" रात्रीं एकानें कोणी तरी जागें राहून पाहरा केला पाहिजे. कारण मघाशीं जो सिंह गर्जना करीत होता तोच अवचित येऊन हजर झाला तर !"

हॅान्सनें त्याचें बोलणें हंसण्या वारीच उडविलें. परंतु थोड्या-वेळानंतर अगदीं नजीकच ती गर्जना ऐकूं आली. त्यामुळें सिंह महाराज येतात कीं नाहीं याबद्दल आणखी कोणची शंका राहिली नाहीं. आह्मीं सगळेंचजण बंदूक घेऊन ऊभे राहिलों. आपलें संरक्षण करण्याकरितां त्याला मारणें भाग होतें. शिवाय त्याचें कातडेंहि नेण्यास हवें होतें. आह्मी सर्वजण एकदम पुढें सरसावलों. आमच्या अग्नीपासून थोड्याश्या लांबीवर एका लहानशा डोंगराची एक टेकडी होती. त्याच्याच वर येऊन सिंह आमच्याकडे पाहात होता. दिवसाच्या वेळीं इतकी माणसें एकत्र असलेलीं पाहून तो हवा तर पळूनहि गेला असता; परंतु रात्र होती ह्मणून त्याचें साहस वाढलें होतें. गुर गुर करीत करीत आणि शेपूट हालवीत हालवीत आस्ते आस्त डोंगराच्या वरून तो आमच्या बाजूला उतरूं लागला. तेव्हां आह्मीं गोळ्या झाडावयाच्या असें ठरविलें. प्रथम हॅारी व जान यांनीं गोळ्या माराव्या आणि त्यांच्या गोळ्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं असें दिसल्यास मी व हॅान्स या दोघांनीं गोळ्या घालाव्या. असा क्रम ठरविला.

सिंह हळूं हळूं पुढें येत होता. त्याचे प्रचंड केशर आणि त्याच्या जवळच त्याचें तें बारकुळें चपळ शरीर, हीं आम्हांस चांगलीं दिसलीं. दोन वेळां तो थबकून उभा राहिला. आणि त्या बरोबर त्यानें भयंकर गर्जनाहि केल्या. हॅारि व जान यांनीं बहुतेक एकाच वेळीं गोळ्या सोडल्या. परंतु त्यांच्या गोळ्यांचा कांहींच उपयोग झाला नाहीं. सिंहानें रागानें आमच्यावर उडी घेण्याची तयारी केली. तो उडी मारणार इतक्यांत मी व हॅान्सनें गोळ्या झाडल्या. ह्या वेळीं नेम अगदीं बरोबर लागूंपडला. तो बिचारा थोड्या अंतरावर धाडकन् पडून थोडीशीं धडपड करून मरून गेला. आम्हीं तेव्हां मोठ्यानें चित्कार करून आमचा जयध्वनि प्रगट केला.

त्यानंतर आम्ही अग्नीजवळ परत येऊन चांगल्या प्रकारें अग्नी पेटवून निजण्याची तयारी केली. या वेळीं आतां सावध झालों.

रात्रीच्या पहिल्या भागांत जॉन व हॉन्स यांनीं पाहरा करावा व दुसऱ्या भागांत मी व हॅरिनें करावा असें ठरविलें. कदाचित् रात्रीच्या वेळीं निजलों असतां पुनः एखादा सिंह किंवा चित्त्या-वाघ आला; किंवा हत्ती, रेडा अथवा गेंडा येऊन जर तुडवून गेला तर निजल्या जागींच महा निद्रा लागावयाची.

---

# प्रकरण ८ वें.

## वाघोबांचा हल्ला आणि हत्तींचा हल्ला !



अग्नी पेटवून हिंस्र पशूंना भय दाखवून जेव्हां आपलें प्राणरक्षण करण्याची पाळी येते, तेव्हां निश्चित मनानें गाढ झोंप घेतल्यास रक्ताची आवड असणाऱ्या हिंस्र प्राण्यांना अनायासेंच नरडीचा घोट घेण्यास सांपडावयाचा. त्यामुळें आम्हाला त्या दिवशीं झोंप लागली होती असें मुळींच नाहीं. रात्रीच्या दुसऱ्या भागांत ठरल्याप्रमाणें मी व हॅरी पाहरा करण्यास उठलों. झोपेनें सगळें शरीर भरून गेलें होतें, डोळे पाहूं शकत नव्हते. तरीहि प्राण्याच्या भीतीनें पाहरा करणें भाग होतें. त्याशिवाय सर्व दिवसभर त्या दिवशीं भुकेनें व तहानेनें प्राण जाण्याची पाळी आली होती. बसून राहिल्यास झोंपी जाईन म्हणून मी हातांत बंदूक घेऊन उभा राहिलों. बिस्तरापासून फारसा लांब गेलों नाहीं. कां कीं, डांस आणि दुसरें कांहीं पतंग यांचा चोंहींकडे सुळसुळाट झाला होता. शिवाय थोडेसें पुढें गेल्यास सिंह व्याघ्रादि पशूंच्या शुभ आगमनानें जागच्या जागींच गार होण्याची भीति होती.

आम्ही जागें आहोंत, तों गुर गुर असा शब्द व मधून मधून गर्जना ऐकूं येऊं लागल्या. हायेना, लांडगे, व नानाप्रकारचे रात्रीं हिंडणारे पक्षी यांचे आवाज कानांवर येऊं लागले. एकंदरींत पाहिल्यास ते शब्द कानांला मधुर लागत नव्हते तर ते भीतिप्रदच होते. पण हे सर्व आवाज ऐकून ऐकून आमच्या कानांना त्यांची संवयच होऊन गेली होती. म्हणून आम्ही त्याची फारशी पर्वा केली नाहीं. शेवटीं हॅरीला उठवून म्हणालों, आतां तुझी पाळी, मी थोडीशी विश्रांति घेत पडतों.

हॅरी म्हणाला—फार झोंप येते बुवा, काय करावें, जागणें भाग आहे. मला वाटतें, पुनः सिंह येऊन हजर होणार.

मी कांहींहि न बोलतां बिस्तवाऱ्याजवळ एके जागीं हातपाय ताणून झोपीं गेलों. पांच एक मिनिटें डोळे मिटले असतील नसतील तोंच हॅरि ओरडून म्हणाला,—फ्रेड, फ्रेड, ऊठ, जानला जागा कर. पुनः युद्ध केलें पाहिजें.

मी तर बंदूक घेऊन गडबडीनें चटकन् उठून बसलों. पाहतों तर पांच सात हात अंतरावर एक काळ्या रंगाचा प्राणी किरण साधून बसला आहे. जणुं काय आतां इतक्यांत तो उडी मारीत आहे असें दिसलें. त्याचें दोन्ही डोळे अंधेरांत चक् चक् चमकत होते. मागल्या बाजूनें हॉन्स " अरे बापरे " म्हणून ओरडला. त्याबाजूलाहि त्याच्या पासून जवळच मांजरामारखा एक प्राणी पाहण्यांत आला.

मी मोठ्या जोरानें ओरडून म्हणालों, हॉन्स, तूं व जान त्याची खबर घे. आणि मी व हॅरी याला मारतों.

तो प्राणी थोडासा पुढें येऊन त्यानें हॅरीच्या बाजूला उडी मारली. पाहतों तर तो चित्त्या वाघ आम्हीं दोघांनींहि गोळ्या झाडल्या. त्या अगदी नेमक्या लागल्या व तो वाघ एक प्रकारें अग्नीच्या आंतच पडून धडपड करूं लागला. त्याच वेळीं हॉन्सच्या बंदूकीचे आवाजहि ऐकूं आले. त्यांचा चित्ताहि मरून पडला.

शत्रूंचा वध केल्यानंतर आम्हीं त्याच्या अंगावरील कातडीं सोलून घेतलीं. पहिल्या चित्त्याच्या अंगाला आगीची हाय लागून तो थोडासा भाजला होता. रात्र बहुतक संपत आली होती तरि हि यावेळीं चांगल्याप्रकारें पाहरा केला पाहिजे हें आम्हीं अनुभवानें जाणलें. हॉन्स पडल्या पडल्या गाढ झोंपीं गेला. त्यालाच जागत ठेवण्याचा बेत केला तो हि थोडीशी बडबड करून शेवटीं कबूल झाला.

परंतु, हाय, हाय, निजणार कसें? आगींत भाजलेल्या

चित्याची जी दुर्गंधी सुटली होती, तिचा वास येऊन हायेनाच्या टोळ्यांच्या टोळ्या व लांडगे येऊन आमच्या सभोंवतालीं भयंकर शद्ब करूं लागले. अग्नी पेटलेला होता म्हणून आमच्या जवळ ते येऊं शकले नाहींत. एवढीच काय ती सोय. बाकी सारी रात्र त्यांचें गायन श्रवण करीत आणि त्यांचा गडबडगुंडा पाहात घालविली. बाकी आमचाहि गडबडगुंडा कांहीं कमी उडाला नव्हता.

सकाळ होतांच पुनः ती जागा सोडून आम्हीं एखाद्या लहानशा तळ्याच्या शोधार्थ निघालों. खाण्याकरितां हरिण किंवा पक्षी यांची तर पुनः शिकार करावयास हवी होती. त्याशिवाय पाणीहि जवळ फारसें शिल्लक नव्हतें. तें तर हवेंच होतें.

हॉन्स हा मनुष्य स्वभावानें मोठा आडमुठा होता. थोडेंसे लांब गेल्यावर तो आपल्या जवळचें कातड्यांचे ओझें जानच्या डोक्यावर लादण्यास आला. हॉरीनें तसें करण्यास त्याला मनाई केली. तेव्हां हॉन्स रागानें बंदूक उचलून हॉरीला मारण्यास प्रवृत्त झाला. मी पाहिलें. हें काय नवेंच लचांड! जान सुरी बाहेर काढून त्याला कापण्यास निघाला तेव्हां मी व हॉरीनें त्याला प्रतिबंध केला. आम्हीं ठरविलें कीं, हॉन्सची बंदूक वगैरे काढून घेऊन त्याला त्या वाळवंटाच्या प्रदेशांत हांकून द्यावयाचें. जानला बंदूक अडकविण्याचें कातडें दिलें व त्याला पळत जाऊन हॉन्सचें हात मागल्या अंगानें बांधण्यास सांगितलें. आणि हॉरीला त्याचे पाय बांधण्यास सुचविलें. त्या दोघांनीं जाऊन हॉन्सला तर बांधलेंच, पण त्या गृहस्थानें तोंडांतून कांहीं शद्बहि न काढतां केवळ बंधन सोडण्याकरितां झटापट करण्यास मात्र सुरवात केली. त्यानें दांतांनीं जानच्या हाताचा चावा घेतला. तो माणूस अगदीं वेडा बनून गेला होता. त्याचे दोन्ही हात चांगल्या प्रकारें बांधले आणि पायाचें बंधन मात्र सैल करून दिलें. हेतु हा कीं, त्याला चालतां यावें पण पळतां येऊं नये.

बांधण्याचें काम पुरें झाल्यावर हॉन्सला आमच्याबरोबर चाल-

ण्यास सांगितलें. पण अगोदर तो कबूलच होईना. शेवटीं दुसरा कांहीं उपाय नाहीं असें पाहून रागानें जळफळत जळफळत तो चालूं लागला. त्याच्या खांद्यावर आम्हीं कातड्याचें ओझें लादून दिलें. मधून मधून त्यानें पळण्याचाहि प्रयत्न केला परंतु तो सफळ झाला नाहीं.

पुष्कळ वेळपर्यंत चालून चालून शेवटीं आम्ही एका झऱ्याजवळ येऊन हजर झालों. तेथें कित्येक झाडें होतीं. त्या झाडांच्या खोडांवर हत्तींच्या दातांच्या खुणा व झाडपाला तोडल्याचीं चिन्हें पाहून आम्ही ताडलें कीं, तेथें हत्ती येत जात असावे. म्हणून तेथेंच गूपचीप दडून राहिल्यास हत्ती येतील आणि शिकारहि मिळेल असें वाटलें. तळ्यांतून पाणी नेऊन आम्ही झाडाच्या आडोशाला एका निवांत जागीं गेलों. बरोबर जें थोडेसें मांस होतें तें भाजून सर्व खाऊन टाकिलें. त्यानंतर हॉन्सला जवळ बसवून ठेऊन आम्ही थोडेसें निजलों. जानला म्हणालों—" हॉन्स कदाचित् पळून जाईल. तरी त्याच्याकडे नजर ठेव. "

थोड्या वेळानंतर जागे होऊन पाहतों तर सगळेंच जण गाढ झोपेंत मग्न झालों होतों. आणि हॉन्सहि पण नाहीं ! जाननें हॅरीलाहि जागें केलें. त्या माणसानें गुन्हा केला असूनहि त्याच्यावर मोठी दया करण्यांत आली. आम्ही त्याला हुडकण्यास निघालों. पायांच्या खुणांनीं माग काढीत काढीत दूरवर गेलों. शेवटीं पायांच्या खुणाहि दिसेनात. तेव्हां संध्याकाळ होत आली होती, यामुळें त्याला यापुढें शोधणें शक्य नाहीं असें पाहून आम्ही त्या निवांत जागीं पुनः परत आलों. जर दोन एक हत्ती आले तर शिकार करूं आणि रात्र काढून सर्वजण तंबूकडे परत जाऊं— असा बेत ठरविला. त्यानंतर तंबूंतून कांहीं माणसें आणून हॉन्सचा शोध करतां येईल. असें म्हणून आम्ही स्वस्थ बसलों.

थोडा वेळ बसल्यानंतर पाहतों तर असें दिसलें कीं, कांहीं हत्ती आपणांकडेसच येत आहेत. त्यांना आमच्या आगमनाची

बातमी लागली होती. तरी पण तहानेनें पीडलेलें असल्यामुळें ते पुढें येऊं लागले. इतक्यांत एकाएकीं आम्हांला असें दिसलें कीं, एक मनुष्य चित्कार करीत करीत पहिल्या हत्तीच्या समोर येऊन उड्या मारीत आहे. तो माणूस दुसरा कोणी नव्हता. हॉन्सच होता. त्याचें डोकें इतकें बिघडलें होतें कीं, तो मरण्याकरितां त्यांच्या पुढें जात होता. पाहतों तों असें दिसलें कीं, पहिल्या हत्तीला आम्ही मारूं शकल्यास कदाचित् हॉन्स वाचूं शकेल. म्हणून मी पहिल्या हत्तीला गोळी मारली. परंतु तो भयंकर हत्ती रागानें पुढें आला आणि त्यानें पायानें हॉन्सला तुडवून तुडवून त्याचा अगदीं चेंदामेंदा केला. अरेरे गरीब बिचारा! त्याच्या देहाचें फार हाल झाले. हत्तीनें हॉन्सला सोंडेनें उचलून आकाशांत फेंकून दिलें. आणखी एक गोळी खाऊन हत्ती खालीं पडला. दुसरा हत्ती हॉरीच्या गोळीनें मेला. बाकीचे हत्ती भीतीनें पळून गेले.

आम्ही पळत पळत हॉन्सला पाहण्यास निघालों. जाऊन पाहतों तर बिचाऱ्याच्या सर्व हाडांचा एकच गोळा झाला होता. तोंडहि विद्रूप झालें होतें. तें बहुतेक ओळखतांहि येत नव्हतें. आम्ही आजूबाजूच्या झाडपाल्यांतून कित्येक डहाळ्या कापून आणून त्याचें शरीर चांगल्या प्रकारें झांकून ठेविलें. हेतु हा कीं लांडगे किंवा हायेना यांनीं तें खाऊं नये. नंतर आपल्या जागीं पुनः परत गेलों व हत्तीचें थोडेंसें मांस घेऊन शिजवून खाल्लें. एकाएकीं जान म्हणूं लागला—हा इकडे एक प्रकाश दिसत आहे.

आम्ही पहातों तर खरोखरच दूर अंतरावर एक प्रकाश दिसत होता. आम्हाला वाटलें कीं, तेथील कोणी तरी लोक तंबू ठोकून कांहीं तरी करीत असतील. आम्हीं ठरविलें कीं, त्या प्रकाशाजवळ जावयाचें, आणि तेथें काय आहे याचा शोध लावावयाचा. अग्नीच्या जवळ जाऊन आम्ही थबकलों. आम्हांला पुढें जाण्याचें धैर्य झालें नाहीं. जानला आम्ही पुढें पाठवून तें काय प्रकरण

आहे तें पाहून येण्यास सांगितलें. थोड्या वेळानंतर तो परत येऊन म्हणाला तेथें टोको राहिला आहे, धनी साहेबहि आहेत. ती आमचीच मंडळी !

कांहीं न बोलतां गपचीप जाऊन आम्ही एकदम सर्वांना आश्चर्यचकित करून सोडलें. काकांना फारच आनंद झाला. आमच्येवर कांहीं तरी गंडांतर आलें असावें म्हणून ते फार काळजी करीत होते.

आम्ही दोन हत्ती मारले आहेत असें ऐकून इतर चाकर माणसें लगेच हत्तींचे मांस आणण्यास जाण्याच्या तयारींत गुंतलीं. सकाळीं दिवस उगवल्यावर खाणें—पिणें आवरून चाकरमाणसें घेऊन आम्ही सर्वजण मिळून तिकडे गेलों. हत्तीचें मांस व दात कांपून घेतले. नंतर एक खड्डा खणून त्यांत हॉन्सचें प्रेत पुरण्यांत आले. इकडे तिकडे हिंडतां हिंडतां टोकोनें बातमी आणिली कीं, त्याला चार पांच हत्ती दिसले आहेत. त्याच्या सांगण्याप्रमाणें थोडेंसें पुढें जाऊन आम्ही ते हत्ती पाहिले. तेथें झाडेंझुडें पुष्कळच होतीं. काकांनीं सर्वांना हत्तींना चोहोंकडून घेरून टाकण्यास सांगितलें. आणि प्रत्येकाला एकेका झाडावर चढून बसण्यास सुचाविलें. तसे केल्यास हत्ती मारण्यास आला तर त्याच्या सपाट्यांत सांपडण्याची भीति राहणार नाहीं, व कांहीं संकटहि ओढवणार नाहीं असें ते म्हणाले.

तीन हत्ती अगदीं जवळ उभे राहून झाडपाला खात होते. बाकीचे हत्ती थोडेसे दूर होते. दूरचे हत्ती काकांच्या स्नेह्यांच्या वांटणीस गेले होते. जवळच्या तिघांना आम्ही मारण्यास तयार झालों. झाडाचीं खालचीं पानें खावून ते वरची पानें खाण्यास लागणार, इतक्यांत आम्ही झाडांच्या आडून छपत छपत पुढें चाललों. तेव्हांहि हत्तींना आम्ही येत आहों याची चाहूल लागलीच नव्हती. आम्हीं एकेक झाड आपणाला पसंत केलें. काकांच्या बंदूकीचा आवाज आला तेव्हां मीहि गोळी झाडली.

काकांच्या बंदूकीचा आवाज ऐकून मी ज्या हत्तीला गोळी घातली, त्यालाच हॅारिनेंहि गोळी घातली. आमचा हत्ती भयंकर चित्कार करून उसळला व तो इकडे तिकडे धाऊन शत्रू कोठें आहे तें शोधूं लागला. तेव्हां मी तावडतोब एका झाडाजवळ जाऊन पुनः गोळी भरून घेतली. हत्तीचें डोकेंच तेवढें दिसत होतें. फिर गोळी झाडण्यापूर्वी तो हत्ती थोडासा पुढें येऊन गुडघे टेकून खालीं निजला. इतक्यांत हॅारीचा चित्कार ऐकूं आला. तेव्हां मी पळत पळत हॅारीच्या जवळ जाऊन पाहतों तर त्याच्या हत्तीनें सोंड वर करून त्याला बहुतेक पकडलेंहि होतें. मी तावडतोब त्याला गोळी घातली. तेव्हां तोहि हत्ती पडला.

या दोन हत्तींना बहुतेक मारून चीत केल्यानंतर आम्ही दोघेहि काकांचें काय झालें ते पाहण्यास निघालों. ते कोठें आहेत तें ओळखण्या करितां आम्ही दोघांनींहि हाका मारल्या. परंतु आमच्या हाकेचें उत्तर आलें एका सिंहाच्या गर्जनेनें. नीट न्याहा-ळून पाहतों तों काका एका झाडावर बसून राहिले आहेत, आणि त्यांच्या खालीं एक सिंह बसून त्यांच्याकडे पाहून गुर गुर शब्द करीत आहे, असें दिसलें. ह्याला न मारल्यास रक्षण होण्यास मार्ग नाहीं असें पाहून आम्ही दोघेजणहि आस्ते आस्ते एका झाडाच्या आड दडलों आणि सिंहानें डोकें फिरवितांच आम्ही दोघांनींहि त्याच्या अंगावर गोळ्या झाडल्या. सिंह बिचारा तेथेंच तात्काळ मरून पडला. " शाबास ! शाबास ! चांगलें केलेंत. आतां हत्तीलाहि मारलें पाहिजे. " असें म्हणून काका झाडावरून खालीं उतरले, आणि चकार शब्दहि न बोलतां आम्हांला बरो-बर घेऊन, ते हत्तीच्या शोधार्थ निघाले.

---

# प्रकरण ९ वें.



## कोयागोचा नाच आणि हत्तींचा जांच ! !



किरें झाडींतून बाहेर पडून मैदानांत येतों तों आम्हांला लांब अंतरावर एक हत्ती दिसला. तो त्या मैदानांतून मोठ्या वेगानें चालला होता. त्याच्या बरोबर झपस्यानें चालून शिकार करतां येणें अगदीं अशक्य होतें. तथापि काकांची इच्छा झाली कीं, त्याला मारलेंच पाहिजे. काकांना अशी इच्छा होण्याला कारणहि होतें. पाहतों तों हत्ती जेथून जात होता, तेथें रक्त पडत होतें. त्यावरून तो जखमी हत्तीच असला पाहिजे, असें आम्हीं ताडलें. आणि त्यामुळें त्याला मारण्यास फारसा विलंब लागेल असेंहि वाटलें नाहीं.

काका म्हणाले,--"चला, चला, त्याला आतां गांठूं. सिंह येऊन मध्येंच विघ्न न करतां तर इतक्या वेळांत त्याला नाहींसा-हि केला असता. सुदैवानें तुम्हीं आलांत म्हणून बरें झालें ! नाहीं तर मला सिंहाच्या हातूनच मृत्यु येतां."

काकांच्या बरोबरच आम्हीहि चाललों होतों. हत्तीची गति हळूहळू कमी होऊं लागली. तरी पायानें चालून त्याला गांठणें कठीण होतें. म्हणून आम्हीं जेथे आमचे घोडे बांधले होते, तेथें झटकन् परत जाऊन आपआपल्यां घोड्यावर बसून हत्तीच्या शोधार्थ निघालों. घोडे थोडेसें पळविल्यावर हत्तीहि दिसूं लागला. आम्हांला पाहतांच त्यानें सोंड वर करून चिर चिर शब्द करीत, आमच्या अंगावर येण्याची इच्छा दर्शिविली. काकांनीं साहस करून पुढें सरून त्याला गोळी मारिली व गोळी मारतांच हत्ती-

च्या हल्ल्यापासून आपलें रक्षण करण्याकरितां घोड्याचें तोंड फिरवून ते थोडेंसें दूर जाऊन उभे राहिले. तेंव्हां मी व हॅरीनें पुढें येऊन गोळ्या झाडल्या. त्याबरोबर हत्ती चीत झाला.

काका मला म्हणाले,—"तूं तंबूंकडे जाऊन दोन गाई घेऊन ये म्हणजे हत्तीचें दांत व मांस त्यावर लादून नेऊं. मी व हॅरि इतर मेलेल्या हत्तींचा शोध करतों व सिंहहि कोठें पडला आहे तें पाहतों."

ती जागा जरी तेंव्हां माझ्या फारशी परिचयाची झाली नव्हती, तरीहि साहस करून मी त्या रस्त्यानें निघालों. मला वाटलें कीं, मी रस्ता ओळखून काढीन व नीट तंबूंत जाऊन पोहोंचेनहि. म्हणून तिकडे जाण्यास निघालों. थोडेंसें दूर जातों इतक्यांत लांब लांब गळ्यांच्या जिराफांचा एक तांडा वाटेंत भेटला. तो पाहण्याची मोठी मौज होती. शिकार करतां करतां मनांत आलें कीं, जिराफाची शिकार करावी म्हणून त्यांच्याकडे निघालों.

एकाएकीं पाहतों तर, माझा घोडा एका खड्ड्याच्या अगदीं धारेवर आला आहे. आणखी जरासा तो पुढें जातां तर तो धाडकन् कड्यावरून खालीं खड्ड्यांत पडता. आणखी थोड्याशा वेळानें पाहतों तर दोन जिराफ त्या कड्यावरून फडाफड खालीं खड्ड्यांत पडले. मागें पाहतों तर तद्देशीय लोकांची एक टोळी हातांत भालें घेऊन शिकार करण्यास येत होती. त्यांनींच जिराफांना हुसकून आणिलें.

ते जिराफ ज्या खड्ड्यांत पडले होते, तो सुमारें बारा फूट खोल होता. एकाचे समोरचे पाय खड्ड्याच्या आंत आणि मागचे पाय खड्ड्याच्या तटाच्या कांठावर अडकले होते. तर दुसऱ्याचे मागचे पाय खड्ड्यांत आणि समोरचे पाय तटाच्या कांठांवर अडकले होते. त्यांचें शरीर केवळ वर हालत होतें. आणि त्यांची भली लांबलचक मान सापाप्रमाणें इकडे तिकडे हालत होती. ते

वर चढण्याकरितां अगदीं शिकस्तीचा प्रयत्न करीत होते पण व्यर्थ. शिकारी लोकांनीं त्यांना घेरूनहि टाकलें. शिकारी लोकांनीं खड्डे खणून त्यावर बारीक सारीक गवत व झाडपाला झांकून टाकिला होता. अशा खड्ड्यांना " जिराफ धरण्याचे खड्डे " असें म्हटल्यासहि चालेल.

शिकारी लोकांच्या हातीं जिराफांना सोडून देऊन मी तंबूकडे चाललों. आतां मात्र फार सावधगिरीनें चाललों होतों. कां कीं, न जाणों मीच जिराफांच्या खड्ड्यांत जाऊन पडलों तर ! जातां जातां थोडक्याच वेळांत तंबूत जाऊन पोहोंचलों. तंबूपासून गाई घेऊन काकांच्या जवळ गेलों. जाऊन पाहतों तर आणखीहि कित्येक हत्ती व हरणें मारण्यांत आलीं होतीं. हत्तीचें मांस, दांत वगैरे जें नेतां आलें तें घेऊन आलों.

दुसऱ्या दिवशीं आम्ही उत्तर दिशेकडे निघालों. एका मोकळ्या मैदानांतून जातां जातां पाहतों तर एक कसलेंसें जनावर एका खड्ड्यांत पडलेलें असून तें एकदां वर चढत आहे, पुनः पडत आहे असें दिसलें. हा प्राणी काय आहे तें पाहण्याकरितां पुढें जाऊन पाहतों तों तो कोयागो होता. तो अगदीं हुबेहूब गाढवाप्रमाणें दिसत होता. तो खड्ड्यांत कसा पडला होता कोण जाणें. त्याला वर चढतां येत नव्हतें. हॉरीचें म्हणणें होतें कीं, कोयागोला धरावें. तो म्हणाला,—" दोरीनें पाय बांधून त्याला वर खेंचून काढावें, आणि नंतर बरोबर न्यावें. म्हणजे यावर बसून घोड्याप्रमाणें फेरफटका करतां येईल. "

टोको आणि हॉरी यांनीं एक थैली व दोरी आणिली. टोकोनें त्याच्या तोंडाला थैली लावून ती त्याच्या तोंडाशीं अगदीं गच्च बांधिली. त्यामुळें त्याला कांहीं दिसेहिना व चावतांहि येईना. त्यानंतर त्याच्या गळ्याला व पायाला दोरी बांधून लांकडाचा ओंडा उचलतात त्याप्रमाणें हा हूं करीत करीत सर्वांनीं मिळून त्याला वर उचललें. कोयागो महाराज वर येतांच चाऱ्ही पाय

उचलून थै थै नाचूं लागले. तेव्हां दोन तीन बडगे पाठींत पडतांच स्वारीचा आनंद मावळला. त्यानंतर त्याच्या पाठीवर एक जिन लादून हॉरी ताडकन् उडून त्याच्यावर बसला. मी त्याला नको म्हणणार, तोंच त्यानें त्यावर चढून त्याला पळविलेंहि. मला अशी भीति वाटूं लागली कीं, असलें एकादें रानटी जनावर लवकर स्वाधीन होणार नाहीं इतकेंच नव्हें, तर तें हॉरीला कोणीकडे तरी भिरकावून देईल. म्हणून मी टोकोला घेऊन व घोड्यावर बसून हॉरीच्या मागोमाग निघालों.

समोरच आम्हांला कोयागोचा एक कळप दृष्टीला पडला. तो आम्हांला पाहतांच ताडताड पळूं लागला. आम्हीं त्याच्या मागोमाग हां हूं करीत निघालों. रस्त्यांत पाण्याचें डबकें किंवा झरा वगैरे कांहींहि नव्हतें. तरी खडकाळ जमिनी, दाट जंगलें, व अनेक दरीखोरीं ओलांडीत आम्हीं चाललों. घोडे अगदीं थकून गेले. परंतु हॉरीचा कोयागो तेव्हांहि मोठ्या जोरानें धांवत होता. त्याचें दुसरे भाऊबंदहि पळत आहेत असें पाहून त्याच्या पायालाहि अगदीं दम नव्हता. हॉरीला असें नेतां नेतां त्यानें जर एकाद्या अरण्यांत नेलें तर एकादें गडांतर उत्पन्न होणार असें आम्हांला वाटलें. परंतु आतां काय करावें तेंच आम्हांला कळेना. इतक्यांत एकाएकीं एक नामी संधि आली. तद्देशीय काळ्या लोकांची एक टोळी हातांत भाले वगैरे घेऊन बरोबर त्या कोयागोंच्या पुढेंच येऊन दाखल झाली. त्यांच्या चित्कारांनीं इतर कोयागो इकडे तिकडे सैरावैरा पळूं लागले. आणि हॉरीचा कोयागो दचकून एकदम उभा राहिला. तो फारच थकून गेला असावा असें वाटलें. नंतर तो हळूहळू चालूं लागला.

काळे शिकारी लोक कित्येक कोयागो मारून आमच्या जवळ आले. आणि वटावटा करून आमच्याशीं कितीतरी बोलले पण आम्हांला त्यांतलें एक अक्षर समजलें असेल तर शपथ ! टोकोनें आम्हांला सांगितलें कीं, ते आम्हांला पाहून फार आनंदित झाले

आहेत, आणि आपल्या गांवीं चलण्याविषयीं ते मोठ्या आनंदानें आम्हांला निमंत्रण देत आहेत.

त्यांच्या गांवीं जाण्याची आम्हांला फारशी इच्छा नव्हती. परंतु तेव्हां संध्याकाळ होत आली होती, व तंबूकडे जाण्यास फार श्रम पडणार असून, संकटेंहि उत्पन्न होण्याचा संभव होता, म्हणून आम्हीं त्यांच्या गांवांत गेलों. आम्हीं यापूर्वी येथील लोकांच्या ज्या कांहीं झोंपड्या पाहिल्या होत्या, त्यांच्यापेक्षां ह्या लोकांच्या झोंपड्या मोठ्या व दाट विणलेल्या होत्या. ते लोक जात्या शिकारी असतांहि शेतकी करून त्यावर आपला निर्वाह करीत. गांवाच्या मागच्या आंगाला पिकांनीं भरलेलीं शेतें होतीं तीं आम्हीं पाहिलीं.

मांस मिळतांच त्यांच्या मुलींनीं तें शिजविण्यास आरंभ केला. थोडा वेळानंतर गांवांतील सर्व लोक तेथें येऊन जमले. आम्हीं आणखी फार वेळ त्यांच्याशीं मिसळून न राहतां एका घरांत झोंपी गेलों. थोडीशी झोंप घेतों इतक्यांत चोंहींकडून रडण्याचा भयंकर आवाज आणि आरडाओरडाहि ऐकूं आली. त्यांनीं आमची झोंप उडाली.

तेव्हां तावडतोब बाहेर येऊन पाहतों तर गांवांतील स्त्रिया आपलीं लहान लहान मुलें बिछान्यांतून ओढून आणून त्यांना काठीनें झोडपीत आहेत आणि त्यामुळें मुलें मोठमोठ्यानें किंकाळ्या फोडीत आहेत असें दिसून आलें. ह्या निर्दय कृत्याचें कारण काय म्हणून विचारतां टोको म्हणाला कीं, त्यांच्या शेतांतील पिकामध्यें हत्तींचा एक कळप येऊन शिरला आहे; म्हणून आपल्या मुलांबाळांना रडवून व स्वतःहि आरडाओरड करून हे लोक त्या हत्तींना हुसकून लावण्याचा प्रयत्न करीत आहेत.

हत्तींच्या आगमनाची ही बातमी ऐकून आम्हांला कांहीं वाईट वाटलें नाहीं. या कळपांतील जितके हत्ती मारतां येतील तितके बरें, असें वाटून आम्ही बंदूक घेऊन हत्ती मारण्यास निघालों.

आमच्या बरोबर आम्ही तेथील चारपांच माणसेंहि घेतली. त्यांनीं आम्हांला झाडें दाखवून द्यावीं आणि आम्हीं त्यावर चढून हत्ती मारावे असें ठरलें. जातां जातां पाहतों तर गावांतील कित्येक माणसें बरोबर येत होतीं. पुरुषांच्या हातांत एकेक दिवटी होती व ते तोंडानें चित्कार करीत होते. त्यांच्या बरोबरच बायकांचा चित्कार, मुलांचें रडणें व कुत्र्याचें भुंकणें हीं मिळून गांव जणुं काय आतां रसतळास जात आहे असा भास होत होता. अंधा-रांत आम्हीं झाडांवर चढलों, झाडांवरून पाहतों तों दिवट्यांच्या उजेडानें किंवा लोकांच्या चित्कारांनीं भिवून जाण्याचें तर दूरच राहो, पण ते उलटे आपल्या लांब लांब सोंडा पुढें करून अरण्यांतील दाट गवतपाल्यांतून झपाझप पुढें येत होते. आम्हीं समोरच्या दोन हत्तीवर गोळ्या घातल्या, तेव्हां ते दोन हत्ती पडले. त्याब-रोबर बाकीचे हत्ती दचकून एकदम उभे राहिले. पुनः गोळ्या भरून घेऊन आणखी तिघांना मारल्या तरीहि बाकीच्या हत्तींना विशेष भीति वाटली आहे असें दिसलें नाहीं. दोन एक हत्तींनीं मोठ्यानें चित्कार केला. थोडेंसें थांबून ते पुनः पुढें येऊं लागले. आम्हीं फेर गोळी मारत आहों इतक्या वेळांत आमच्या जवळून ते पुढें गेलेंहि आणि शेतांभोंवतालचें कुंपण तोडून टाकून आंतील पीक खावूं लागले. तेव्हां आम्हीं आणखीहि तीन हत्ती मारलें. नंतर ते एकेक एकेक असे पुढें चालले. समोर कांहीं झोंपड्या होत्या. त्या त्यांनीं पाय देऊन अगदीं जमिनदोस्त केल्या,जणूं काय त्या काग-दाचे घरच.टोको म्हणाला, "अशा प्रकारें हत्तींचे अत्याचार पुष्कळ वेळां होतात. लोकांनीं पराकाष्ठेची आरडा ओरड केल्यामुळें त्यांनीं आणखी फारशी नासधूस केली नाहीं."

तो कळप जेव्हां बहुतेक निघून गेला तेव्हां आम्हीं झाडावरून उतरून त्यांच्या मागोमाग चाललों. मागच्या बाजूनेंहि आम्हीं कित्येकांना ठार केलें. ते किती असावे तें नक्की सांगतां येत नाहीं. कां कीं, अंधारांत त्यावेळीं आम्हाला कांहीं कळलेंच नाहीं.

पुन: गावांत जेव्हां परत आलों तेव्हां असें दिसलें कीं,गांवांतील लोक पिकाची नासाडी झाल्यामुळें दुःख करीत होते. पहाट होतांच आम्हीं काकांच्या जवळ जाऊन मेलेल्या हत्तीची गोष्ट सांगितली, तेव्हां ते आनंदित होऊन गाडी घेऊन त्या गांवाकडे आले. गांवकरी लोकांनीं आमचा फारच आदरसत्कार केला. ते लोक फार चांगले होते. त्याचें जें पीक नाहींसें झालें होतें त्याची भरपाई त्यांना हत्तीच्या मांसानें करून घेतां आली. आम्ही पाहतों तर बहुतेक सर्वांनीं थोडथोडें मांस घरासमोर टांगून वाळत घातलें होतें. त्यामुळें एक प्रकाराची घाण दुर्गंधी सुटली होती.

हत्तींच्या दातांनीं आमच्या गाडीची बहुतेक भर्ती होऊन गेली. आणखी एखाद्या दिवशीं चांगल्या प्रकारें शिकार करतां आल्यास आमच्या ह्या वेळच्या सफरीची गरज पूरी होईल असें वाटलें म्हणून आम्हीं, तेथील लोकांना म्हणालों, कीं, त्यांनीं जर हत्तींचा कळप कोणीकडे गेला त्याची बातमी आणून आम्हांला दिली तर आम्हीं त्यांना मोठें बक्षीस देऊं.

त्यादिवशीं रात्रीच्या वेळीं आम्हीं निजलों आहों इतक्यांत कडकड करून विजेचा भयंकर आवाज आला. आमची झोंप उडाली. एकाएकीं कांहीं शब्द ऐकूं आले. पाहतों तों आमच्या तंबू जवळच गांवांतील लोक मोठ्यानें चित्कार करीत होते. आम्हीं बाहेर पडलों आणि ज्या बाजूकडून आवाज येत होता. त्या बाजूला जाऊन पाहूं लागलों; पाहतों तर, गांवांतील सर्व पुरुष धनुष्यबाण घेऊन बाहेर आले होते, आणि जेव्हां जेव्हां वीज चमकत असे तेव्हां तेव्हां लगेच ते मेघावर बाण सोडीत होते.

त्यांच्या ह्या अद्भुत कृत्याचें इंगित काय, तें आम्हांला कांहीं कळलें नाहीं. टोको म्हणाला,—बाण मारून मेघांना हांकून देतां येतें, अशी त्यांची भावाना आहे. म्हणून ते असे करीत आहेत.

आम्हांला त्या माणसांचें तें अज्ञान पाहून हसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. थोड्या वेळानंतर पावसाच्या सरी कमी झाल्या. त्या रानटी लोकांना हवें तर असेंहि वाटलें असेल कीं, आपल्या बाणांच्या माऱ्यानें जर्जर होऊनच ढग पळाले.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं आम्हाला अशी बातमी लागली कीं, सुमारें आठ मैल अंतरावर हत्ती हिंडत आहेत. तेव्हां त्या बाजूला आम्ही रवाना झालों. हत्ती ज्या बाजूला चढत होते त्याच्या दुसऱ्या बाजूला एक पाणथळ जमीन होती. याकरितां आम्ही घोडे सोडून दिले. आणि कोयोगाला एके ठिकाणीं बांधून टेविलें. त्यानंतर झाडावर चढून किंवा दाट झाडींत छपून आपापल्या जागेवरून हत्ती मारूं लागलों. पुष्कळ प्रयत्न केल्यानंतर कित्येक हत्ती मेले व बाकीचे पळून गेले.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं कित्येक पक्षी मारण्यांत आले व त्यांच्यावर त्या दिवशीचें भोजन केलें. घोडे व कोयागो यांना आणण्यास जातों तर तीं खुशाल चरत हिंडत होतीं; कोयागो-पासून चांगल्या प्रकारें काम करून घेतां येईल किंवा नाहीं, ह्या-संबंधानें हॉरी व मी वादाविवाद करीत आहों इतक्यांत पाहतों तर घोडे एकाएकीं उड्या मारूं लागले, व इकडे तिकडे पळूं लागले.

" अरे, हा काय प्रकार आहे ? " म्हणून हॉरी मोठ्यानें उद्गारला.

एकाएकीं पाहतों तर एका डबक्यांतून दोन प्रचंड गेंडे बाहेर येत आहेत असें दिसलें.त्यांच्या पाणथळ प्रदेशांत घोडे आले होते, तें पाहून त्यांना मोठा राग आला असावा असें दिसलें. आम्हीं तावडतोब बाजूला झालों नसतों तर त्यांच्या शिंगांच्या भोंसकण्यानें ठार झालों असतों. घोडे तेव्हांच उधळले. कोयागो बिचारा पळूं शकला नाहीं. यामुळें एक गेंडा त्याला मारण्यास येऊन त्यानें शिंगानें त्याचें पोट फोडलें व त्याला एक प्रकारें जमीनींत कोंबलें.

आम्हीं कोयागोला वाचवूं शकलों नाहीं. तरीहि आम्हीं दोघांनी वारंवार गोळ्या सोडून एका गेंड्याला मारलें. दुसरा आमच्या तंबूकडे गेला. आम्हाला वाटलें कीं आतां हा तंबूंतील सामान-सुमान व गाडी वगैरे सर्व कांहीं उधळून देणार, परंतु सुदैवानें तसें झालें नाहीं. टोको दुसरीकडून आला आणि त्यानें कांहीं गोळ्या सोडून त्याला मारिलें

त्या दिवशीं संध्याकाळीं आह्मांला आनंदि आनंद झाला. वाघाचीं कातडीं,गेंड्यांचीं शिंगें आणि हत्तींचे दांत आमचे जवळ विपुल सांठले होते. यामुळें गाडीची पूर्ण भरती झाली होती. या वेळच्या सफरींत आणखी कांहीं पदार्थ घेतां येणें अशक्य आहे, असें पाहून आम्हीं वाळवंटाच्या प्रदेशाचा त्याग केला आणि हळूं हळूं आमची सर्व टोळी घेऊन समुद्राकडे चाललों.

'वाल्फीशबे' नामक उपसागरांत येऊन पोहोंचल्यावर सर्व सामानसुमान बोटींत चढवून आम्हीं आपल्या प्रिय जन्मभूमीकडे येण्यास निघालों. कारण एका कवीनें म्हटलें आहे कीं,—

पोटासाठीं भटकत जरी दूर देशीं फिरेन ।
मी राजाच्या सदनिं अथवा घोर रानीं शिरेन ॥
नेवो नेतें जड तनुस या दूर देशास दैव ।
राहे चित्तीं प्रिय मम परी जन्मभूमी सदैव ॥

या कव्युक्ती प्रमाणें आपल्या जन्मभूमीची आठवण ठेऊन आम्हीं परत आलों. आणि आपल्या घरीं येऊन संसाराला लागलों.



# याच ग्रंथकाराचीं अन्य पुस्तकें.



नव्य-विज्ञान अथवा आधुनिक शास्त्रीय जगत्—यांत गेल्या पन्नास वर्षांत लागलेल्या शास्त्रीय शोधांची चित्ताकर्षक माहिती दिली आहे. सदर पुस्तकास डे. व्ह. ट्रान्सलेशन सोसायटी पुणें व मराठी ग्रंथोत्तेजकमंडळ, इंदूर या संस्थांनीं बक्षीस दिलेलें असून मे.डायरेक्टर आफ् पब्लिक इन्स्ट्रक्शन इलाखा मुंबई यांनीं प्राथमिक व दुय्यम प्रतीच्या शाळांना बक्षिसाकरितां व लायब्ररीकरितां मंजूर केलें आहे. किंमत ८ आणे.

२ अमेरिकेचा इतिहास—यांत अमेरिकेसंबंधानें स्फूर्तिदायक माहिती वाचण्यास मिळते किंमत १२ आणे.

३ मुसलमान आणि मराठी भाषा:—दहाव्या महाराष्ट्र साहित्य संमेलनांत वाचलेला उत्कृष्ट निबंध. किंमत ४ आणे.

पुस्तकें मिळण्याचा पत्ता:—शिकंदरलाल आतार
मु. पो. भिलवडी जि. सातारा,

